संगीत



# सैरंध्री नाटक.

हें पुस्तक

## माधवराव नारायण पाटणकर

(पाटणकर संगीत मंडळीचे म्यानेजर व मालक.)

यांनीं लिहिलें

तें

## बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, यांनीं

मुंबईत

"मुंबईवैभव" छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केलें.




सन १९०९

# प्रस्तावना.

प्रसिद्ध महाभारतांतर्गत विराटपर्वांतील एक वर्षाच्या इतिहासाचें सार या चरित्रांत गोविलें आहे. पौराणिक नाटकांत नाट्यरचनेच्या सोईसाठीं कांहीं ठिकाणीं थोडे बहुत फेरफार करावे लागतात, परंतु ते देखील वाटेल तसे करणें अयोग्य होय. भारतीय कथानकें बहुतकरून लोकांच्या श्रवणपथावरून गेलेलीं असल्यामुळें त्यांच्या अभिरुचीला बाध न येईल अशा बेतानेंच ही रचना केलेली आहे. भगवंताची कृपा असली तरी देखील प्रत्येक प्राणिमात्राला पूर्वसंचित क्रियमाण कर्से भोगावें लागतें हेंच या नाटकांतील मुख्यत्व आहे. रामायणांतील श्रीरामचंद्राचा वनवास व हें अज्ञातवासाचें चरित्र अवलोकन करून संकटावस्थेंत सांपडलेल्यांना हा एक प्रकारचा कित्ताच आहे. याचें वळण जो गिरवील त्याला सुखदुःखाबद्दल हर्षामर्ष कधींही वाटणार नाहीं. धीरोदात्त महात्मे व महापतिव्रता स्त्रिया अखेरपर्यंत आपलें सत्वधीरत्व न सोडतां शांतपणानें कालक्रमणा करून सदैव जनादरास कसे पात्र होतात या गोष्टीचें सूक्ष्मनिरीक्षण सहृदय जनाला किती आल्हाद देतें हें कथन करण्यास लेखणी असमर्थ आहे. आपल्या भारतीय सतपुरुषांच्या चरित्रापासून हताश झालेल्या स्त्रीपुरुषांनीं बोध घेतल्यास श्रमसार्थकता होईल अशी कर्त्याला पूर्ण उमेद आहे. ती श्रीकृष्णकृपेनें पूर्ण होवो हीच [illegible] चरणीं सदैव प्रार्थना आहे. धर्मराजाचें गांभिर्य, [illegible]सेनाची वीरश्री, द्रौपदीचा कडकडीत पातिव्रत्यप्रभाव, विराटाची स्नेहबुद्धि, कीचकाचा उर्मटपणा इत्याद्यनेक गोष्टींचें या चरित्रांत मिश्रण असलेलें जनास बोधप्रद झाल्यावांचून कसें राहील? असो आज सात वर्षें या चरित्राचे प्रयोग पुष्कळ ठिकाणीं लोकप्रिय झाल्यामुळें कर्त्याची स्मृति कांहीं तरी जगांत रहावी म्हणून हें चरित्र प्रसिद्ध केलें आहे. तरी रसिक व गुणग्राही आर्य बांधवांनीं सत्यादरपूर्वक याचा संग्रह करावा हीच सविनय विनंति आहे.

# अर्पणपत्रिका.

कैलासवासी श्रीयुत मित्रवर्य रा. रा. वासुदेव
रामचंद्र जोगळेकर, बी. ए. एल् एल्. बी.
हायकोर्ट वकील, मुंबई, यांस त्यांची
विद्वत्ता, मित्रत्व, नाट्यनिपुणता व
गुणग्राहकता इत्यादि अमोल्य
सद्‌गुणांच्या स्मरणार्थ
हें पुस्तक अत्यंत प्रेमानें
अर्पण केलें
असे.

पुस्तककर्ता.

# या नाटकांतील पात्रें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सूत्रधार | ... | ... | ... | नाटकाचार्य. |
| धर्मराज<br>भीम<br>अर्जुन<br>नकुल<br>सहदेव | ... | ... | ... | पांडव. |
| धौम्यमुनि | ... | ... | ... | पांडवांचा गुरू. |
| विराट | ... | ... | ... | मत्स्यदेशाचा राजा. |
| कीचक | ... | ... | ... | विराटाचा सेनापति. |
| उत्तर | ... | ... | ... | विराटपुत्र. |
| नटी | ... | ... | ... | नाटकाचार्याची स्त्री. |
| सुधेष्णा | ... | ... | ... | विराटाची स्त्री. |
| द्रौपदी (सैरंध्री) | | ... | ... | पांडवांची भार्या. |
| उत्तरा | ... | ... | ... | विराटाची कन्या. |

प्रधान, भाट, दासी वगैरे.



श्रीगुरुदत्तप्रसन्न.

# संगीत सैरंध्री नाटक.

## मंगलाचरण.

( सूत्रधार—पद-राग सारंग ताल धुमाळी. )

सूत्रधार परमात्मा नाटकी विश्वरंगीं नटला ॥ श्रीहरी ॥ अघटित वेषें मायानटीसह अहर्निशीं सजला ॥ श्रीहरी ॥ धृ० ॥ कोणा हंसवी कोणा रडवी दाखवुनी लीला ॥ श्रीहरी ॥ कर्मे जखडुनि टाकियले कीं अवघ्यां सजिवाला ॥ प्रभुनें ॥ जैसीं कर्मे तैसें फल दे ब्रह्मांडीं सकला ॥ प्रभुतो ॥ नटी नटेश्वर चरण सरोरुहीं अर्पुनी सुमनाला ॥ आतां ॥ मागतसे वरदान माधव कर जोडुनी प्रभुला ॥ धृ० ॥

पद-( राग काफी. )

श्रीकृष्णलीला सुधेतें ॥ सेविती जे जन उद्धरती ते ॥ धृ० ॥ संकटकालीं रक्षण करुनी ॥ निजभक्तातें तोष देऊनी ॥ अक्षय आनंदातें ॥ दे पदकमलीं सहवासातें ॥ धृ० ॥ पंच पांडवा द्रुपदसुतेचा ॥ कैवारी तो झाला साचा ॥ श्रीहरि पदकमलातें ॥ भजुनि तरुनि जा भवजलनिधितें ॥ धृ० ॥ सतिचरिताचा महिमा गातां ॥ विसरुनी जाते भवभयचिंता ॥ माधव अज्ञकवीतें ॥ अनुभव दिधला रुक्मिणीकांतें ॥ धृ० ॥

भगवान् सच्चिदानंदाच्या नामसंकीर्तनासारखी मनाला आनंद

देणारी दुसरी कोणतीही गोष्ट नाहीं. तशांतून परमेश्वराच्या साह्या-वांचून कोणचाही कार्यभाग तडीला जाणार नाहीं. तेव्हां प्रत्येक प्राणीमात्रानें यथामती भगवन्नामसंकीर्तन केल्यावांचून राहूं नये. असो. आतां जास्त पाल्हाळ लावून रसिकजनांचा मनोभंग न करितां योजिलेल्या कार्याला लागलें पाहिजे. आर्ये, जरा इकडे ये पाहूं.

**नटी**—नाटकाचार्य, काय आज्ञा आहे?

**सूत्रधार**—एकसमयावच्छेदें करून या अद्वैतवनांत जमलेल्या रसिक जनांचें मनरंजन कोणत्या प्रकारें होईल या शिवाय आज्ञा कोणती असणार? तर या ऋतूला अनुसरून गायन कर.

**नटी**—आर्या, आपल्या अनुज्ञेप्रमाणें गायन तर करतेंच; पण आज आपण कोणत्या चरित्राचा प्रयोग करून दाखविणार आहांत?

**सूत्रधार**—त्याबद्दल मूळपिठिका तुला सांगतों—

पद-( नाट्यकलाभिज्ञ० )

**व्यासमुनी विरचित या भारतामृता ॥ सेविती तया मिळेल सौख्य तत्वतां ॥ धृ० ॥ मुनिवाणी श्रवण मना देइ शांतता ॥ हृदयंगम सैरंध्री चरित सत्कथा ॥ नाट्यस्वरुपांत करुनी दावितों आतां ॥ यत्किंचित अंगीं जरि नाहीं पात्रता ॥ परि सद्गुरुनाथ नतां देइ साह्यता ॥ धृ० ॥**

आणखी दुसरें असें पहा—

साकी.

**सत्पुरुषावर दुर्दैवाचा येउनि पडतां घाला ॥ भोगुनि जाती विपुल यातना धीर न सोडिती धृतिला ॥ संचित क्रियमाणा ॥ भोगिति धरुनी शांतपणा ॥ धृ० ॥**

अशा प्रकारचा हुबेहुब प्रसंग पुण्यश्लोक युधिष्ठिर पांडव व सती द्रौपदी यांच्यावर श्रीकृष्णाचें साह्य असतांना कसा ओढवला हें अवलोकन करून सर्वांनीं त्यापासून कांहीं तरी बोध घ्यावा हाच हें नाटक लिहिण्याचा माझा हेतु आहे. तो श्रीकृष्णकृपेनें पार पडो.

**नटी**— पद-( हरिपदांबुजा झणि वंदुनी )

शरदृतु कितितरी रमणिय हा ॥ धरणी देविस भूषवितो पहा ॥ धृ० ॥ नभिं उदेला पूर्ण शशी हा ॥ सुखकर रजनी समय प्रिया हा ॥ द्यूतांत घालवुं खेळुनीयां ॥ धृ० ॥ द्यूतामध्यें पण लावोनी ॥ अगणित धन जनिं संपादोनी ॥ बहुविध सुख तें उपभोगोनी ॥ आनंदातें सेविती निशिदिनीं ॥ द्यूतांत घालवूं समय हा ॥ धृ० ॥

**सूत्रधार**—आर्ये, सर्वस्वी नष्ट करणाऱ्या द्यूताचें नांव सुद्धां काढूं नकोस.

( पडद्यांत )

**भीमसेन**— श्लोक.

रे रे दुष्ट मदांध तापहतका मूर्खाग्रणी दुर्जना ॥ क्रोधाविष्ट करी असह्य तव ही द्यूतेपणा मन्मना ॥ घायें चूर्ण करील ही मम गदा राहे यशस्वी करीं ॥ प्रायश्चित्त असेंचि युक्त तुज हें दुष्कीर्तितें स्वीकरी ॥ धृ० ॥

**नटी**—प्राणनाथ, ही सिंहाप्रमाणें भयंकर गर्जना कुणाची बरं असावी ?

**सूत्रधार**—प्रिये, महाबलवान बलसागर भीमसेन धर्माज्ञेवरून धौम्यमुनीच्या आश्रमाकडे निघाला असतां द्यूतासंबंधीं तुझी उत्सुकता श्रवण करून संतापानें हिकडे येत आहे.

**नटी**—प्राणनाथ, माझें रक्षण करा. ( मिठी मारते व दोघें जातात ).

( भीमसेन प्रवेश करितो. )

**भीमसेन** **श्लोक.**

**द्यूतें कांतारवासी वसुमतिवरति पांडवांना करोनी ॥**
**सर्वस्वी नागवीलें म्हणुनि भटकतों द्वादशाब्दें श्रमोनी ॥**
**धर्माज्ञें बद्ध झालों सतत निशिदिनीं राग हा आवरोनी ॥ झालों ध्यानस्थ शंभूपरि महिवरती शांतिला या वरोनी ॥ ध्रु० ॥**

काय करावें, धर्माज्ञा उल्लंघन करतां येत नाहीं म्हणून सांपळ्यांत सांपडलेल्या सिंव्हाप्रमाणें माझी स्थिती झाली आहे. नाहीं तर या द्यूतोच्छुक दंपतीचें आतांच या गदेनें चूर्ण केलें असतें. धौम्यमुनीच्या आश्रमाकडे जाण्याबद्दल मला आज्ञा झाली त्याप्रमाणें मी आश्रमासंनिध आलोंच. परंतु अद्याप पांचालीसह धर्मराज कां बरें येत नाहींत ? ( पडद्याकडे पाहून ) अहाहा ! या धर्मदर्शनानें माझा कोपाग्नि शांत झाला.

( सर्व पांडव द्रौपदीसह येतात. )

**धर्मराज**—( आकाशाकडे दृष्टी लावून ) भगवांन द्वारकाधीशा, तुझी माया मोठी अगम्य आहे. रंक असो वा राव असो, तुझ्या दरबारीं न्यायाचा कांटा अगदीं समतोल आहे. संचित क्रियमाणाप्रमाणें प्रत्येकानें कर्मगती भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं. परंतु आम्ही मूढ मानव तुला दुःखप्रसंगीं व्यर्थ दूषण मात्र देतों. सुख असो वा दुःख असो, सदा सर्वकाळ तुझें चिंतन करून जो संतुष्ट राहील त्याला या जगांत कसलीही अपेक्षा नाहीं.

( सर्वजण चिंतन करितात )

पद–( दीपकल्याण–त्रिताल )

**॥ जयश्री राधा रमणी रमणा ॥ दीनदयाघन चिरसुखसदना ॥ पंकजनयना पन्नगशयना ॥ भक्तकाम कल्पद्रुम सुमना ॥ धृ० ॥ द्वादशवर्षें वनवासातें ॥ कंठुनि गेलों प्रमुदित चित्तें ॥ कृपाकटाक्षें भो यदुवीरा ॥ जगदोद्धारा परमोदारा ॥ सुहास्य वदना ॥ जनार्दना ॥ ॥ धृ० ॥ बिकट असा अज्ञातवास हा ॥ उमजुन देइन कौरव समुहा ॥ भो जगदीशा दुरित विनाशा ॥ भवभयपाशा ॥ मोचन करिं क्षणीं नंदनंदना पतितोद्धरणा ॥ धृ० ॥**

**धर्मराज**—बाळा भीमसेना, अर्जुना, नकुला, सहदेवा, सकुमारी पांचाळी, या पुढील कार्यक्रम अत्यंत अपमानास्पद आहे. बारा वर्षें केव्हां गेलीं हें आपणाला मुळींच जाणवलें नाहीं. परंतु हें अज्ञातवासाचें वर्ष मात्र अतिशय खडतर आहे. आपणां पुरुषांना हें विशेष जड जाणार नाहीं. परंतु कोमलांगी द्रौपदीची स्थिति पाहिली कीं, हृदय कसें दुःखानें भरून येतें. शिव शिव! इतक्या सर्व अनर्थाला कारण मीच. द्यूतकर्माला प्रवृत्त झाल्यामुळें तुम्हाला हें दुःख भोगावें लागत आहे, दुसरं काय. "कर्मणो गहनो गति."

( बेहोश होतो. )

**भीमसेन**—( धर्मराजाला सावध करून ) दादा, आपणासारख्या सूज्ञ पुरुषाचें दुःखोद्गार हृदय चूर्ण करून टाकितात. आपण अपयशाला एकटेच अधिकारी काय म्हणून होतां ? झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या. त्याबद्दल आतां विषाद मानणें हा कांहीं पुरुषार्थ नाहीं. प्राचीन इतिहास अवलोकन केलेत म्हणजे आपणावर जो कांहीं प्रसंग आला आहे याच्या मुळाशीं ईश्वराचाच कांहीं हेतु

असला पाहिजे. पुण्यप्रतापी राजा हरिश्चंद्र, श्रीरामचंद्र, पुण्यश्लोक नलराजा, यांना नाहीं का कर्मगतीनें आपदा भोगाव्या लागल्या ? त्यापैकींच हें एक आपलें चरित्र आहे. सज्जन छलावांचून दुष्टांचें पारिपत्य होत नसतें; हा न्याय सर्वकालीं सारख्या प्रमाणानें परमात्मा घडवून आणतो व हे सर्व खेळ त्याचेच आहेत. मी म्हणतों याचा आपण शांतपणें विचार करा.

पद–( श्रीमंतीचा गर्व नच करा )

**॥ या जगामधें कर्म असे कीं सकलाहुनिं बलवान ॥ नाहीं यास समान ॥ धृ० ॥ श्रीमानातें करी दरिद्री दरिद्र्या करि श्रीमान ॥ करितें ॥ भोगल्याविना कधि न सुटे चालु न दे अभिमान ॥ धृ० ॥ रंक असो वा राव असो कीं कुमती सुमती समान ॥ मानी ॥ स्वर्ग मृत्यु पाताल तलातल व्यापुनि उरलें जाण ॥ बंधो ॥ आहे ॥ विरिंचि हरिहर सुरासुरावर केली यानें तान ॥ खरोखर ॥ अवमानातें सहन करोनी कर्मा पुढती मान ॥ लवविती ॥ मृत्यु ज्यापरि कोणा न सुटे त्यापरि कर्मचि जाण ॥ धृ० ॥**

**अर्जुन**—भीमदादा, आपण म्हणतां ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पंचपांडव दिसण्यांत मात्र निरनिराळे पण जीवरूपानें एकच आहेत. आपपर भावाचा जिथें लेशही नाहीं तिथें माझ्यामुळें हा दुःख प्रसंग ओढवला असें धर्मराज ह्मणतात हें योग्य नाहीं. कार्याकारण भाव फक्त परमेश्वरालाच माहित. आपण सर्व कळसूत्रीं बाहुलीं आहोंत. तो जगन्नायक सूत्रधार सूत्र हालवील तसें आपण नाचणार. आपल्या हातीं कांहीं एक नाहीं.

**नकुल**—धनंजयदादा, आपणा उभयतांच्या भाषणानें तरी

दादांचें समाधान होवो. घडलेल्या सर्व गोष्टींचें दादा आपल्या माथींच काय म्हणून अपयश घेतात? छल ही एक कसोटी आहे. दुसरें कांहीं नाहीं.

**सहदेव**—हिऱ्याचें घर्षणावांचून तेज कधीं तरी चमकेल काय? सुवर्णाला ताव दिल्यावांचून त्याची खरी परिक्षा होत नसते. तद्वत्तच आपली गोष्ट आहे. विश्व हें एक रंगस्थल आहे, व त्यावर परमात्मा नानाप्रकारचीं नाटकें दाखवून आपलें लीलाप्रदर्शन जनाला दाखवितो. जग हा सुखदु:खाचा घडामोडीचा प्रचंड बाजार आहे. हा बाजार असाच कायम रहावयाचा. जगाचा अंत होईपर्यंत हा कधींही बंद पडावयाचा नाहीं. आज जे शोकग्रस्त आहेत ते कांहीं कालानंतर हांसतील व हांसतात ते रडतील. हें रहाटगाडगें कधींही बंद पडावयाचें नाहीं.

**द्रौपदी**—आपण सर्व सुखी तर मला सुख. माझ्यापेक्षां सती तारामती, देवी जानकी व दमयंती, यांच्यावर किती तरी मोठे प्रसंग येऊन गुदरले. त्यांच्यापुढें माझ्या दु:खाची काहींच मातबरी नाहीं.

पद-( रामासि सतत भजुनियां )

**॥ प्राचीन समयीं जगतिं या ॥ सु व्रता स्त्रिया ॥ असुख भोगुनियां ॥ जगमान्य जाहल्या भूपति रमणीया ॥ तारामती ती सती दमयंती ॥ जानकी सुमती ॥ कीर्ति रूपानें ॥ जनिं जिवंत असती अजुनि पहा गुणवंता ॥ मी तरी हरीची भगिनी ॥ असें या सुजनीं परीया ॥ मग कासया असुख मानुं अंतरि या ॥ दुर्दैव भोगल्याविना ॥ सोडि नच कुणा ॥ करुनि अवमाना ॥ हीरका घर्षणें पहा तेज कीं चढतें ॥ ध्रु० ॥**

**धर्मराज**—( गहिंवरून ) अहाहा ! ही तुमची सहानुभूती पाहून मी काय बोलावें हें मुळींच सुचत नाहीं. असो, आतां या पुढें हा दुर्धर अज्ञातवास कोठें व कोणत्या प्रकारें काढावयाचा हें सर्वत्रांच्या विचारानें ठरवून मग श्रीगुरु धौम्य मुनींची आज्ञा घेऊन पुढील कार्याला लागलें पाहिजे. खरं नाटक पुढेंच आहे. यांतील भूमिका इतक्या बेमालूम वठविल्या पाहिजेत कीं, मोठया मार्मिक नटानें देखील कांहीं वेळ थक्क झालें पाहिजे. सोंगें हवीं तितकीं घेतां येतात पण त्यांची बतावणी करणेंच मोठें बिकट काम आहे. यासाठीं ज्याला जें साधेल तें त्यानें पतकरावें. आणखी मला वाटतें आपण सर्वजणांनीं मिळून राजा विराटाकडे आश्रयाबद्दल विनंति करावी. तो उदार असल्यामुळें आपली विनंती सहज मान्य करील. द्यूतकर्मांत मी निपुण आहें तेव्हां राजाची मर्जी मी सहज संपादन करीन. आणखी कंक या नांवानें मी त्यांचेकडे राहीन.

**भीमसेन**—दादा, हें आपलं म्हणणं मला अगदीं पसंत वाटतं. मी देखील उत्कृष्ट पाकनिपुण व मल्लविद्येंत निष्णात आहें. तेव्हां बल्लव या नांवानें मी कालक्रमणा करीन. इतर नाजूक साजूक कामगिरी आपणाला साधणार नाहीं. तेव्हां जें चांगलें साधेल त्याचाच प्रत्येकानें अंगिकार करावा.

**अर्जुन**—मी नर्तन गायन व वादनकलेमध्यें प्रवीण आहें. शिवाय उर्वशीच्या शापानें मला एक वर्ष अपौरुषत्व येणार आहे. यासाठीं मी स्त्रीवेश धारण करून बृहन्नडा या नांवानें विराटाकडे शिक्षकिणीचें काम करीन, व कामगिरी बेमालुम पार पाडीन.

**नकुल**—अर्जुनदादा, आपली कामगिरी बरीच नाजुक व कठीण आहे. आपल्या सारख्या मार्मिक व चतुर पुरुषाला ती अगदीं सुगम आहे. मी देखील अश्वपरिक्षेंत निष्णात आहें. तेव्हां ग्रंथिक

हें नांव धारण करून आपल्या करामतीनें राजाची मर्जी सहज संपादन करीन.

**सहदेव**—दादा, जनावरांचें संगोपन कसें करावें ही कला मला चांगलीच अवगत आहे. तेव्हां तंतिपाळ या नांवानें विराटाकडे राहून त्याच्या गोशाळेंत आनंदानें कालक्रमणा करीन.

**धर्मराज**—प्रिये याज्ञसेनी, तूं कोणता वेष पत्करणार?

**द्रौपदी**—मी राणी सुदेष्णेची वेणीफणी करण्याचें काम पत्करून तिच्या अंतःपुरांत राहून दासीच्या वेषानें वास्तव्य करीन.

**धर्मराज**—शिव! शिव! जिचें नख देखील कुणाच्या नजरेस पडणार नाहीं अशा सकुमार महासाध्वी राजकन्येला असली अपमानास्पद कामगिरी पत्करावी लागत आहे. तस्मात् हे कर्मा, तुझी लीला मोठी अगाध आहे. असो; प्रसंगीं धैर्य धरून कठिण प्रसंग कसाबसा पार पाडला पाहिजे. भगवान श्रीगोपालकृष्णा, तुझ्या कृपेनें जशीं बारा वर्षें पार पडलीं तसेंच हें बिकट अज्ञातवासाचें वर्ष पार पडेल याबद्दल बिलकुल शंका नाहीं. असो; आतां तुझी प्रार्थना करून व श्रीगुरु धौम्यमुनींचा आशिर्वाद घेऊन पुढील कार्याला लागलें पाहिजे. दीनदयाळा—

पद–( जगिं आशेचा पिता )

**॥ भो यदुवीरा करुणागारा नतजन किंकर जगदोद्धारा ॥ परमोदारा इंदिरावरा भक्तवत्सला तापनिवारा ॥ भो कंसारी तूं कैवारी भवभय भीती करि परिहारा ॥ त्वन्नामामृत पूर्ण सेवुं दे हीच विनंति गुणगंभीरा ॥ मंगलधामा पूर्णविरामा पूरितकामा मनोभिरामा ॥ आत्मारामा दे विश्रामा जगन्नायका सौख्य निवारा ॥ धृ० ॥**

( सर्व जण जातात. )

( धौम्यमुनीचा आश्रम. )

**धौम्यमुनी**—भो परमात्मन् !

पद–( राग बिहाग-ताल धुमाळी )

**॥ करुणघना आनंदनिधाना ॥ जगज्ञीवना नंदनंदना पतितपावना दुरितनाशना ॥ चिरसुखसदना पन्नगशायना अवघ्या ब्रम्हांडातें व्यापुनी ॥ उरलासि तूं पंकज नयना ॥ अखिल जीव तव आधिन असती ॥ नित्य करिशी नवीन रचना ॥ घडामोड ही अक्षय चाले अंत न दे तव अघटित घटना ॥ चरण पंकजीं शरण येति ते त्यांच्या करिशी पूर्ण कामना ॥ नित्य निरंजन भजनीं तल्लीन ॥ दिनरजनीं रत होई सुमना ॥ धृ० ॥**

( इतक्यांत पांडव प्रवेश करून वंदन करितात. )

( धौम्यमुनी सर्वांस आशिर्वाद देतात. )

अजातशत्रु युधिष्ठिरा, श्रीकृष्णकृपेनें बारा वर्षे तर पार पडलींच, पण आतां अज्ञातवासाचें एक वर्ष मोठ्या सावधपणानें पार पाडल्यावांचून गत्यंतर नाहीं. बाबारे, या जगांत अनिवार प्रसंग मोठमोठ्या महात्म्यावरच येत असतात, आणखी अशी सहनशीलता ज्याचे अंगीं असेल त्यालाच परमेश्वर कसाला लावून पहात असतो.

पद–( सद्गुरु अवधूत चरण )

**॥ खडतर दुर्दैव खचित भोगल्या विना हें ॥ कधिं न सुटे मुळिं न हटे त्रास दे जना हें ॥ धृ० ॥ हरिश्चंद्र दाशरथी ॥ इंद्र चंद्र निषधपती ॥ या दुर्दैवा पुढती ॥ जनिं झाले मंदमती ॥ लोकोत्तर धैर्य धरा सांगतों तुह्मां हें ॥ धु० ॥**

**धर्मराज**—मुनिवर्य, या सर्व गोष्टींचा विचार करूनच आपली

अनुज्ञा मिळविण्यासाठीं आम्हीं सर्वजण श्रीगुरुचरणीं सादर झालों आहोंत.

पद-( बंजारा )

**सर्वजण—**

**॥ द्वादशाब्द वनवासाचा ॥ संपला काल मुनि साचा ॥**
**अज्ञातवास नियमाचा ॥ कठिण हा समय कीं पुढचा ॥**
**॥ चाल ॥ मुनिवरा पंडुतनयातें ॥ द्या नित्याशिर्वच-**
**नातें ॥ हें शिष्य गुरूचें नातें ॥ कार्धि न तुटे मुनिराज ॥**
**असोंदे लाज ॥ बिकट हें काज ॥ तडिस नेण्याचा ॥**
**संकल्प जाहला आमुचा ॥ ध्रु० ॥**

आणखी विराट राजाच्या आश्रयानें हा कष्टतर अज्ञातवास आपल्या कृपेनें पार पडावा हेंच गुरुचरणीं मागणें आहे.

**धौम्यमुनी**—बाबानों, तुम्हीं सर्वजण सूज्ञ अहांतच. मी सांगावें अशांतला प्रकार नाहीं. पण राजाश्रयांत कोणत्या प्रकारें रहावें याबद्दल तुह्मी अगदीं अनभ्यस्त अहांत. ह्मणून चार उपदेशाच्या गोष्टी सांगतों त्या नीट ध्यानांत धरून तदनुसार वर्तन ठेवा.

पद-( लाल झाली कोपानें )

**प्रतिकुल कालीं धैर्य धरोनी दिवस कंठुनी शांतीनें ॥**
**कालक्रमणा करित असावी कृष्णपदीं ठेवुनि सुमनें ॥**
**नृपसदनीं तुम्ही जपुन असावें हांजी हांजी नच करणें ॥**
**भूपति संन्निध नित्य असावें निकट कधींही नच**
**बसणें ॥ नृपांगनांशीं कधिंही न वदा प्रिय बाळांनों**
**अधिक उणें ॥ नृपवन्हीचा या भूवरती कधींही विश्वास**
**न धरणें ॥ एकविचारें सदा रहावें सांगितलेल्या**
**नियमानें ॥ वर्तन केल्यावर होइल हित हितगुज कथिलें**
**शुद्धमनें ॥ ध्रु० ॥**

आणखी दुसरी एक महत्वाची गोष्ट सांगतों तिकडे बिलकूल दुर्लक्ष करतां कामा नये.

**साकी.**

**पांचालीवर पांच जणांची नित्य असावी दृष्टी ॥ सांप्रतकालीं सर्वांहुनी ती आहे बहुतचि कष्टी ॥ पुरुषांहुनि युवती ॥ संकटीं पडती या जगतीं ॥ ध्रु० ॥**

जा, सुखानें कालक्रमणा करा. भगवान् कृष्णपरमात्मा तुह्मां सर्वत्रांना सुखाचे दिवस दाखवील यांत किमपि संदेह नाहीं. तुमचा अज्ञातवास संपून प्रगट होईपर्यंत तुमचें अभीष्ट चिंतून मी इतर राजकीय मंडळीसहीत राजा द्रुपदाचे घरीं कालक्रमणा करून राहीन. जा आतां.

**सर्व पांडव—**

**पद.**

**॥ बोधसुधेचा हा ठेवा ॥ प्रिय ॥ आपण दिधला अपरंपार ॥ होइल दुखः समूळ परिहार ॥ नित्य घडावी मुनीसेवा ॥ भवजलनिधि हा जगतीं अपार ॥ जाऊं तरुनी सहपरिवार ॥ सद्गुरु चिंतन सेवुनि मेवा ॥ ॥ प्रिय ॥ ध्रू० ॥** ( सर्वजण जातात. )

( दोघे शिष्य प्रवेश करतात ).

**प्रद्युम्न**—मित्रा पद्मनाभा, आपण निद्रिस्त असतां एकाएकीं गुरु धौम्य मुनी आणि पंचपांडव द्रौपदीसहित कसे गुप्त झाले याचें मला राहून राहून आश्चर्य वाटत आहे. आतां शोध कसा लागेल कोण जाणे ? तूर्त तर मोठीच पंचाईत पडली ह्मणायची. कोठें जावें व काय करावें कांहींच सुचत नाहीं. सारांश—भूतचेष्टेप्रमाणें सर्वप्रकार झाला खरा. चल बाबा आतां "भवति भिक्षांदेही"

केल्यावांचून उपाय राहिला नाहीं. या पोटाची आग मोठी भयंकर आहे. ही आग एकदां का भडकली कीं नाड्या आखडल्याच ह्मणून समजावें.

**पद्मनाभ**—मित्रा प्रद्युम्ना, अगोदर दुःख व नंतर सुख पुरवेल पण सुखाअंतीं दुःख भोगणें अगदींच वाईट.

**पद.**

**॥ गुरुविणें जगति या न थारा कीं ॥ न कळत सोडुनि गेले एकाकी ॥ चाल ॥ पांडवाश्रयाची होति जगति साउली ॥ षड्सान्न खावयास जीभ सवकली ॥ कण्याभाकरीचा विट आला कीं ॥ धृ० ॥ धौम्यमुनीवीण शून्य विपिन भासतें ॥ विपुल दुःख या जगांत नित्य नांदतें ॥ सुख असे खचित पहा थोडें कीं ॥धृ०॥**

( विराट नगराजवळील देवीचें देऊळ. )

**धर्मराज**—अर्जुना, भीमसेनाला जाऊन बराच वेळ झाला, अद्याप तो कां येत नाहीं हें समजत नाहीं. एकवार शस्त्रास्त्रें सुरक्षितपणें सुस्थलीं ठेवल्यावर मग भीति नाहीं. कारण शस्त्रास्त्रें हीं प्राणाहून प्रिय आहेत. त्यांचेवांचून आपल्याला आतां एक वर्ष राहणें भाग आहे. देवा ! अशा दुर्धरप्रसंगीं शस्त्रावांचून राहणं भाग आहें. निःशस्त्र वीर म्हणजे जिवंत असून मेल्याप्रमाणेंच आहे. असो. वारा येईलं तशी पाठ देणें भाग आहे. आतां भगवत्‌चिंतन हेंच आपलें अभेद्य शस्त्र आहे. याच्या पुढें प्राकृत शस्त्रास्त्रांची मातबरी ती काय ?

( इतक्यांत भीमसेन प्रवेश करितो ).

**भीमसेन**—दादा, आपल्या सांगण्याप्रमाणें सर्व शस्त्रें शमीच्या झाडावर सुरक्षितपणें ठेऊन देऊन त्याला कोणीही स्पर्श न करील

असा बंदोबस्त करून ठेवला आहे. स्मशानांतील एका प्रेताबरोबर कांहीं वनौषधीचा प्रयोग करून तें भीतिकरितां झाडाला लटकावून ठेऊन दिलें आहे. आतां भीति कसली राहिली नाहीं. आतां श्रीजगदंबेची प्रार्थना करून विराटनगरींत प्रवेश केला पाहिजे. भुकेनें प्राण कसे व्याकुळ झाले आहेत. वेळेवर आत्मारामाला आहुती दिली नाहीं म्हणजे माझें पित्त खवळतें. खरोखर या भुकेला कसा तो धीरच नाहीं. ही भूक नसती तर बरं नसतें का झालें ? आतां जगदंबेचें स्तवन करून नंतर प्रस्थापन करावं.

**धर्मराज**—वत्सा भीमसेना, तुझ्या मर्जीप्रमाणेंच कां होइना ?

( सर्व जगदंबेचें स्तवन करितात. )

**पद** ( शंभो शिवहर करुणाकर )

**॥ महिषासुर मथिनी श्रीभगवती जय जगदंबे चिर-सुखदे ॥ शरणांगत तव चरणीं नत किंकर पांडव शिरिं तव कर असुंदे ॥ धृ० ॥ आज्ञा देइं झणिं जननी अज्ञातवास हा गुप्त अतीशय राहुंदे ॥ धृ० ॥ आदिशक्ति तव दर्शन हें ॥ दुरित निवारण करुनि हरितें भवभय बाधा श्रीवर दे ॥ धृ० ॥**

( आकाशवाणी. )

**॥ गांभिर्यानें धैर्य धरा ॥ न करा चिंता किमपि आतां ॥ संतत मनीं विश्वास असुंदे ॥ धृ० ॥**

( सर्वजण श्रीजगदंबेला नमन करून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( **स्थळ**–विराटराजाची कचेरी. )

( विराटराजा मंत्रीगणासह कांहीं खासगी उहापोह करीत आहेत. )

**विराट**—मंत्री, प्रिय पांडवांना वनवासी होऊन बारा वर्षे परिपूर्ण झालीं. आतां राहिलें तें अज्ञातवासाचें वर्ष त्यांना फारच

गुप्तपणानें घालविलें पाहिजे. शिव शिव ! एका द्यूतामुळें त्यांच्या-वर असा दुर्धर प्रसंग ओढवल्यामुळें त्यांचा मित्रगण निरुपाय होऊन स्वस्थ बसला आहे. अशा वेळीं त्यांना उघडपणानें सहाय्य करावें तर तो दुष्ट दुरात्मा दुर्योधन आपलीं पाळेंमुळें खणून काढण्यास एक क्षणभरही विलंब लावणार नाहीं. त्या अधमानें पांडवांचें सत्व.हरण करण्याला अशा संकटसमयीं सुद्धां मागें पुढें पाहिलें नाहीं. तेव्हां भाऊबंदकीच्या मत्सराची निव्वळ कमाल झाली ह्मणायची ! अज्ञातवासांत ते कोणत्या तऱ्हेनें प्रकट होतील व आपला कावा कसा सिद्धीस जाईल, या विषयीं त्यांचे रात्रंदिवस खल चालले असतात. असो, श्रीकृष्ण पांडवांचा कैवारी असल्यामुळें ते अशाही बिकट प्रसंगांतून पार पडतील यांत बिलकुल शंका नाहीं.

**मंत्री**—सरकार, परमेश्वर नानाप्रकारच्या कसोट्या लावून भक्तांची कसोटी पाहतो. पांडव वनवासांत आहेत तरी स्नान-संध्यादि षट्कर्में यथाविधि चालून लाखों ब्राह्मणांचें अन्नसंतर्पण नित्य चालू आहेच. कोणीही अनाथ येवो, त्याला आश्रय हा मि-ळायचाच. महात्मे कोठें जरी असले तरी रिद्धिसिद्धी त्यांचे द्वारीं दासीप्रमाणें राबतात. सूर्य जरी मेघांनीं आच्छादित असला तरी त्याचें तेज थोडेंच कमी होणार आहे ? ( पडद्याकडे पाहून ) महाराज, ह्या मुनीसारखा तेजस्वी पुरुष इकडे कोण येत आहे ?

( धर्मराज येत आहेत असें पाहून विराट सिंव्हासनावरुन उठून )

**विराट**—अहाहा ! धन्य, धन्य ! या विभूतीच्या दर्शनानें माझें जीवित सफल झालें. चरणरजांनीं माझें मंदिर पूनित होऊन मी खरोखर आज कृतार्थ झालों.

**पद**—( दृष्टीभरे जलभारें. )

**॥ तेजस्वी पुरुषातें ॥ मातें ॥ बघुनी तें ॥ सुख होतें ॥**

**प्रति भानु उगवला येथें ॥ ध्रु० ॥ महा तपस्वी योगी गमतो यातें पाहुनि मानस माझें आनंदें घे गोते ॥ चरण धुलीनें पूनित केलें मत्प्रासादीं करुनि आगमन अमराधिप शचिनाथें ॥ ध्रु० ॥**

( धर्माला योग्य उत्थापन देतो. )

**वे. धर्मराज**—राजा, माझ्यासारख्या गरीब ब्राह्मणाचा इतका आदर करण्याचें कांहीं कारण नाहीं.

**विराट**—महात्मन ! क्षत्रियांचें मुख्य दैवत काय ते ब्राह्मण. मग मी करित आहें हें माझें कर्तव्यकर्मच आहे. आज आपण काय हेतु धरून आगमन केलेंत हें कृपा करून सांगावें. ब्राह्मणासाठीं हा देह चंदनाप्रमाणें झिजावा ही प्रभुचरणीं माझी सदैव प्रार्थना आहे.

**धर्मराज**—अहाहा ! राजा विराटा, ब्राह्मणाविषयीं तुझ्या अंतःकरणांत वसत असलेली आदरबुद्धि पाहून आनंदानें माझें अंतःकरण उचंबळूं लागलं. शाबास, धन्य आहेस तूं ! राजा, अजातशत्रु धर्मराजादि पांडवांच्या नशिबीं वनवास आल्यामुळें आमच्या सारख्यावर असा दुर्धर प्रसंग आला आहे.

पद.

**धर्मासवें द्यूत खेळुनि भूपाल ॥ आनंद सेवित होतों सदाकाल ॥ प्रतिकूल हें दैव जमुनी न दे ताल ॥ ह्मणुनी स्थिती माझी जहालीच बेताल ॥ ध्रु० ॥**

परंतु आजकाल त्यांच्यावर भयंकर प्रसंग आल्यामुळें त्यांचे हजारों आश्रितगण दूरदेशीं मिळेल तेथें आश्रय करून कालक्रमणा करीत आहेत. त्यांचा आश्रय नाहींसा झाल्यामुळें नानाप्रकारचीं क्षेत्रें अवलोकन करित आज तुझ्या नगरींत प्रवेश केला. राजा, तुझी दिगंतरीं कीर्ति ऐकिली ह्मणूनच निःशंकपणें राजमंदिरांत प्रवेश

केला. आतां कांहीं दिवस आश्रय दिल्यास मी तुझा आभारी होईन. ज्यावेळेस पांडव सुखांत पडतील तो दिवस केवळ सुवर्णाचाच समजूं.

**विराट**—विप्रवरा, मी आपला आश्रित शोभेन. आपल्यापुढें मी अगदीं कःपदार्थ आहें. आर्या, आपण माझ्या घरीं आनंदानें कालक्रमणा करावी. धर्मराज व मी दोन आहोंत असें आपण समजूं नये. महाराज, आपलें नामाभिधान काय आहे ?

**धर्म**—राजा, या देहाला कंक असें म्हणतात. राजा, तूं देखील केवळ धर्मराजाचें प्रतिबिंबच आहेस. परमात्मा तुझें नित्य मंगल करो.

( इतक्यांत बल्लव वेषानें भीमसेन प्रवेश करतो. )

**वे० भीमसेन**—राजा विराटा, तुझा निरंतर जयजयकार असो. या देहाचा परामर्ष तुझ्या आश्रयानें व्हावा म्हणून या ठिकाणीं आलों आहें. मरेपर्यंत काम सांगावें व पोटभर खायला घालावं. वेतनाची बिलकूल गरज नाहीं. ना बायको ना पोर, ना घरदार, अगदीं सडेसोट आहें. धर्माच्या आश्रयानें त्यांचा पाकशालाधिकारी होतों. पण आतां ती कर्मकथा सांगून काय उपयोग? सदा सर्वकाळ पक्वान्नें झोडणारा पण दुर्दैवानें आजकाल कंदमूलावर निर्वाह करण्याचें नशिबीं आल्यामुळें नानाप्रकारच्या षड्रस पदार्थांनीं या भुकेनें व्याप्त झालेल्या उदराची कधीं तृप्ती करीन असें मला झालं आहे.

**विराट**--विप्रवरा, आपलं नामाभिधान काय आहे हें सांगाल काय ?

**भीम०**- पद.

**॥ पाककुशल मी नृपाल बल्लव मम नाम आहें ॥**

**सुरुचिर मत्पाक नृपती ॥ सेवाया अमरपती ॥ मिटक्या मारीत बसे ॥ आस धरुनी मोहें ॥ ध्रु० ॥ धर्म भीम पार्थ नकुल॥ द्रौपदी सहदेव विकल ॥ उपवासें दिनचर्या कंठित असतील पाहें ॥ ध्रु० ॥ धनि झाले वनवासी ॥ ह्मणुनी मी परदेशी ॥ हतभागी मज समान कोणि जगतिं नोहे ॥ ध्रु० ॥**

विराटा, सांप्रत पृथ्वीवर महान अवर्षण पडल्यामुळें धर्मराजाचे हजारों आश्रितजन तुझ्या नगरासंनिध उतरले आहेत. राजा, दिनांचें पालन करणें यांतच पुरुषार्थ आहे. शिवाय माझ्या अंगीं एक अप्रतिम कला आहे ती कोणती हें कंकभटजी सांगतील. आत्मस्तुति करणें अगदीं निंद्य होय.—भटजी, आपण मला फार दिवसांपासून ओळखत आहांत, यासाठीं राजापुढें माझे खरे गुण काय आहेत हें कृपा करून कथन करावें. नाहीं पेक्षां "याचको याचकन् दृष्ट्वा श्वानवत् गुर्गुरायते" असें कराल ह्मणून भीति वाटते. राग मानूं नका. ब्राह्मण मत्सरी असतात ह्मणून ओघाला आलें तसें बोललों.

**धर्मराज**—( मनांत आपल्याशीं हांसून ) बहाद्दरानें बतावणी कशी बेमालुम बठविली. ( उघड ) बल्लवा, तुझ्या सारख्याला आश्रय देण्याला समर्थ असा भूतलावर एवढा विराट राजाच दिसतो. राजा, नुसत्या शिफारशीनें जर एखाद्या गरीबाचें कार्य साधत आहे तर त्यांत खरं सांगायला माझं काय जातें ? राजा, हा बल्लव पाकनिपुण तर आहेच, परंतु—

पद.

**॥ बल्लव मल्ल असे बलसागर मत्त गजासी झुंज करी ॥ केसरि रीस भयंकर शार्दुल सहज रगडितो हा नरकेसरी ॥ धर्म भीम किरिटी सहदेवा नकुलासि प्रिय**

**बहु होता भूवरी ॥ सांप्रत भूवरि कालचक्र हें दुस्तर झालें यांस खरोखरी ॥ ध्रु० ॥**

**विराट**—वाहवा! मी महा भाग्यवान ह्मणून हें मानवरूपी रत्न मला लाभलं. असो बल्लवा, मी तुझी मुख्य पाकशालेवर योजना करितों. वाहील तें खा पी स्वस्थ ऐस. मी सांगेन त्या दिवशीं माझा खाजगी स्वैंपाक करीत जा, आणखी खुशाल मल्लशाळेंत कसरत करून ऐस. तुला कोणत्याही गोष्टीची कमतरता पडणार नाहीं.

**भीमसेन**—( मोठ्यानें ओरडून ) भगवान श्रीकृष्णपरमात्मा आपलें सदैव कल्याण करो. ( बसतो. )

( इतक्यांत बृहन्नडेच्या वेषानें अर्जुन प्रवेश करतो. )

**चोपदार**—( हात जोडून ) महाराज, अत्यंत स्वरूपवान अशी परदेशची एक नटी आपल्या दर्शनाची इच्छा धरून द्वारासंनिध उभी आहे. आज्ञा होईल तर घेऊन येतों.

**भीमसेन**—राजा, धर्मराजाच्या आश्रितांचें आज तुझ्या घरीं पेवच फुटलं ह्मणायचें.

**विराट**—बल्लवा, कांहीं हरकत नाहीं. धर्मराजाच्या आश्रितांना आश्रय देणें हें माझं कर्तव्यकर्मच आहे. जा द्वारपाला, तिला आदरपूर्वक आंत पाठवून दे.

( बृहन्नडेच्या वेषानें अर्जुन प्रवेश करतो. )

**अर्जुन**—( राजाला आदरपूर्वक प्रणाम करून ) राजा, तुझी दिगंतरीं कीर्ति ऐकून मी आगमन केलं आहे. सांप्रत भयंकर दुष्काळ उत्तरप्रांतांत पडल्यामुळें पोटार्थी होऊन तुझ्या चरणीं धांव घेतली आहे. आतां या उप्पर आश्रय देणें न देणें तुझ्या मर्जीवर अवलंबून आहे. माझं मुख्य कांम मनोरंजन करण्याचें, पण पोटाच्या

आगीपुढें कोणाचेंही मन स्वस्थ नसल्यावर माझ्या सारख्याची पर्वा कोण करणार ?

**विराट**—तुझें नांव काय व तूं कोणत्या कलेंत प्रवीण आहेस

**अर्जुन**—राजा, मला बृहन्नडा असें ह्मणतात. मी काय काय कल जाणतें हें ऐकून घेऊन आश्रय द्यावा अशी प्रार्थना आहे.

॥ पद ॥

**सुंदर गायन नर्तन वादन करुनि सदा नृपनाथ पांडव कुलांत नांदत होतों ॥ बहुविध सुखोप भोगुनि नृपते ॥ ध्रु० ॥ पारि दुर्दैवें निर्धन झाले धनि माझे जगतांत यास्तव हताश होऊनि फिरतें ॥ दे मज सहाय्य सत्वर नृपते ॥ ध्रु० ॥**

**विराट**—बृहन्नडे, माझी कन्या उत्तरा हिला तूं नर्तन, गायन व वादन, या कला शिकवून खुशाल रहा. कोणत्याही गोष्टींची तुला वाण पडणार नाहीं. जलाशय ओस पडल्यावर त्यांतील कमले सुकून जाणें हें रास्तच होय.

( द्वारपाल प्रवेश करतो. )

**द्वारपाल**—सरकार, एक चाबूकस्वार व गोपाल आपल्या दर्शनाची वाट पहात बाहेर उभे आहेत. या उप्पर सरकारची मर्जी असेल तर घेऊन येतों.

**विराट**—द्वारपाला, आज दरबार अगदीं खुला आहे. कोणालाही इथें येण्याला अडथळा करूं नकोस. जा, त्यांना आंत लावून दे.

( नकुळ व सहदेव प्रवेश करितात. )

**नकुळ**—राजा, स्वदेशीं भयंकर दुष्काळ पडल्यामुळें हिरव्यागार कुरणांकडे जशीं भुकेलेलीं जनावरं धांव घेतात तद्वत या तुझ्या भाग्यवान नगरींत प्रवेश करून आश्रयासाठीं दीनवदन करून आलों

आहोंत. रिकामटेंकडेपणानें उगीच पोटासाठीं दुसऱ्याला त्रास न देतां कांहीं तरी यथाशक्ति सेवाधर्मानें पोट भरावें एवढीच इच्छा आहे.

**विराट**—( नकुलास उद्देशून ) अंगीं कांहीं गुण असेल तर योग्यतेनुसार आश्रय देण्यास हा विराट मागेंपुढें पहाणार नाहीं. आपलें नामाभिधान काय आहे ?

**नकुल**—राजा, या दासाला ग्रंथिक असें ह्मणतात. श्रीधर्मराज सांप्रत वनवासी झाल्यामुळें माझ्यासारखे सुखी आश्रित खडतर दैव-दुर्विलासांत दिवस कंठीत आहेत. असो.

॥ पद ॥

**॥ अश्व परिक्षेंत निपुण मी असे नृपाला ॥ होत्या कीं मत्करिं त्या नृपति अश्वशाला ॥ ध्रु० ॥ तुरंगांसी वि-विधगती नित्य शिकवुनी ॥ प्रविण तया करुनि नृपा गगनिं फेंकुनी ॥ सहजपणें देतों मी ही कला जनीं ॥ शिकलों मी परि विनाश काल पातला ॥ ध्रु० ॥**

**विराट**—ग्रंथिका, तुझ्यासारख्या अप्रतिम गुणी मनुष्याची मला अनायासें प्राप्ति झाली हें माझें मोठं भाग्य-होय. जा, आज-पासून माझ्या अश्वशाला तुझ्या स्वाधीन केल्या आहेत. सुखेनैव कालक्रमणा करून ऐस. ( सहदेवास उद्देशून ) बरं, तूं कोणता उद्देश धरून आला आहेस ?

**सहदेव**—( आदरपूर्वक ) राजन् ! या देहाला तंतिपाल असें म्हणतात, सांप्रत माझ्या देशांत दुष्काळ पडल्यामुळें हजारों जनावरें पटापट मरत आहेत. वृक्षलता सुकून जाऊन नद्यादि जलाशय कोरडे ठणठणीत पडले. कंदमूलांवर आजपर्यंत कसाबसा निर्वाह केला पण तीं देखील अधाशांना कुठपर्यंत पुरणार ? सांप्रत कालाची वक्र-

दृष्टी झाली आहे. तेव्हां अशा वेळीं सदय अंतःकरणानें आश्रय दिल्यास मृताच्या मुखांत अमृत पडल्यासारखें होईल. माझे धनी वनवासी होऊन कुठें भटकत आहेत याचा मला मुळींच मागमूस लागत नाहीं. सुदैवानें ते असते तर मुखांतील ग्रास मला देते पण बलवत्तर दुर्दैवामुळें त्यांचा मला कुठेंही ठिकाण लागत नसल्यामुळें पोटार्थी सैरावैरा धांवत सुटलेल्या भिकाऱ्यांच्या झुंडींत मी प्रवेश केला. राजनगराच्या बाह्य प्रदेशीं उतरलेल्या दीनांना आश्रय देऊन कांहीं तरी सेवा ह्या दासाच्या हातून घडावी अशी इच्छा आहे.

**पद.**

**॥ जनावरांचें पालन मीं ॥ उत्तम परिचें करुनी होतों श्रीधर्माच्या सुखधामीं ॥ गौशालेचा होतों स्वामी ॥ गत गोष्टींचें वैभव कामीं ॥ येत नसे ॥ कधिंही नृपते॥ म्हणुनी मज तें ॥ बहु गांजितसे ॥ आश्रय तव चरणीं झणीं देईं नृपाला मज नामी ॥ धृ० ॥**

**विराट**—( आनंदानें ) अहाहा! कधींही प्राप्त न होणारीं अशीं अमोल्य मानवरत्नें मला आज लाभल्यामुळें माझा आनंद गगनांत मावेनासा झाला आहे. आर्या कंका, बल्लवा, बृहन्नडे, ग्रंथिका, व तंतिपाला, या विराटाच्या घरीं सुखानें कालक्रमणा करावी. ( मंत्र्यास उद्देशून ) मंत्री, या सर्वांची व्यवस्था चांगल्या प्रकारें ठेवा.—

**पद.**

**करूं नका अपमान ॥ राजाश्रित जन मत्सरि असती ॥ कवडीचें नच यांना ज्ञान ॥ धृ० ॥ परदेशांतिल दीन जनांला ॥ सप्रेमें द्या सन्मानाला ॥ सुजनीं जन ते माच्चि-त्ताला ॥ गमती सौख्यनिधान ॥ धृ० ॥ अजातशत्रूचे आश्रित जन ॥ पूज्य असति कीं मज प्राणाहुन ॥ आज्ञो-**

**लुंघन करी तयाला ॥ देइन कधीं जिवदान ॥ ध्रु० ॥**

भगवन्, ही माझी सद्बुद्धी निरंतर कायम राख व दीनाचें दुःख निवारण करण्याचे कामीं हा देह निरंतर झिजो हीच तुझ्या चरणीं अक्षय प्रार्थना आहे.

**धर्मराज**—अशा सदयांतःकरणी नरश्रेष्ठाला दीनदयाघन भगवान कधीं तरी विसरेल का? जगदीश्वरा–

**पद.**

**॥ देवा या नृपतीशीं चिरसुखशांती दे ॥ सहकुटुंब या सहपरिवारें अक्षय सौख्यानंद दे ॥ ध्रु० ॥ न्यायनीती धर्माचा जणुं पुतळा विलसे वसुमती वरती ॥ सदयांतःकरणाचा नृपती ॥ संतति संपत्ती सुख भूवरती ॥ भोगो हा सर्वकाल ॥ इच्छापूरित हो हरि वरदे॥ध्रु०॥**

---

## प्रवेश ३ रा.

### विष्कंभक.

( सुदेष्णेची दासी निपुणिका. )

**निपुणिका**—या विराट नगरींत शेकडों स्त्रीपुरुष हमेशा राजाश्रयासाठीं येतात पण आज दरबारांत आलेले तेजस्वी चार पुरुष व त्यांच्याबरोबर आलेली स्त्री यांना पाहिल्यापासून नानाप्रकारच्या कल्पनातरंगांनीं मन कसें गोंधळून गेलें आहे. अज्ञातवास परिपूर्ण करण्याकरितां पंचपांडव द्रौपदीसह गुप्त वेषानें तर आले नसतील ना? ( कांहीं वेळ विचार करून ) छे! ते इकडे कसचे येतात? मेलं बायकांचं मन मोठं संशयी. कारण नसतां उगीच उठाठेव करण्याची त्यांना संवयच. स्वस्थ बसून मनमुराद सुख भोगणाऱ्या माझ्यासारख्या टवळयांना या गोष्टीची कांहीं तरी पंचाईत! पण

नाहीं. नाहीं नाहीं ते तर्क मनांत सदासर्वकाळ संशयांत असावयाचे. असो. राणीसाहेबांची उठण्याची वेळ झाली. त्या आज श्रीजगदंबेच्या दर्शनासाठीं सायंकाळीं जावयाच्या आहेत. तेव्हां आपण आपल्या कामाला जावं हें बरं. या नवीन आलेल्या परदेशी वनितेला राणीसाहेब ठेवून घेतील तर फारच चांगलं होईल. विधात्यानें तिची प्रतिमा घडविण्यांत फारच कुशलता खर्च केली आहे. पण दुर्देवापुढें त्याचा सर्वतोपरि नाइलाज झाला आहे. खुद्द राणीसाहेब तिच्या दासी देखील शोभणार नाहींत. पण ह्मण आहेना जात्यातले रडतात व सुपांतले हांसतात तशांतली गत. ( जाते. )

( विष्कंभक झाला. )

( सुदेष्णा राणी व तिच्या दासी बसल्या आहेत, एकीकडे अधोवदन करून द्रौपदी उभी आहे असा प्रवेश. )

**सुदेष्णा**–निपुणिके, आजकाल तुझं चित्त ठिकाणावर नाहींसें दिसतें. मोतियाच्या व जाईच्या वेण्या मला आवडतात ह्मणून तुला सांगितलें होतंना ? मग सटवे या सोनचांफ्याच्या वेण्या कशालाग आणल्यास ? सांगतें एक नि करते दुसरंच. अशी दिरंगाई नाहीं हो माझ्या कामास पडायची ? आतां ताकीद देऊन ठेवतें. यापुढें जर कां टाळाटाळ करशील तर पाठीवर चाबकाचे फटकारे मारून तिचें धिरडं करीन. मेलं थोडसं काम तें देखील तुझ्या हातून होत नाहींना ? खुशाल बसून खाणारीं माणसं आळशीच असावयाचीं. जा आतांच्या आतां माळ्याकडे आणखी जाईच्या वेण्या व मोतियाचे गजरे घेऊन ये. थांब जरा, बकुळे तूंच जा आणखी सांगितल्याप्रमाणें वेण्या व गजरे घेऊन ये. जगदंबेच्या दर्शनाला मला लौकर जायचें आहे.

**बकुलिका**–जी ताईसाहेब. ( जाते. )

**सुदेष्णा**--( द्रौपदीस उद्देशून ) बाई, तुम्हीं अशा कां दिसतां? परमेश्वरानें असला कसला दुर्धर प्रसंग तुमच्यावर आणला आहे? आणखी इथें कोणता उद्देश धरून तुह्मीं आलां आहांत?

**द्रौपदी**—( दुःखाचा सुस्कारा टाकून ) राणीसाहेब, माझी कर्म-कथा मोठी विलक्षण आहे; ती ऐकून आपल्याला उगीच शीण मात्र होईल. आतां थोडक्यांत मी आपली कथा निवेदन करितें. मी गंधर्व स्त्री आहें. पण माझ्या पतीला कोणी महात्म्यानें शाप दिल्या-मुळें सांप्रत ते गुप्त झाले आहेत. पण मी दुर्दैवी ह्मणूनच असा प्रसंग मजवर येऊन भूतलावर मी फिरत आहें. पुरुषावांचून स्त्रिया कशा दीन होतात हें पाहून तरी मला आश्रय द्यावा. माझे पती आणखी एक वर्षानें शापमुक्त होणार आहेत तोंपर्यंत मला आश्रय दिल्यास अनाथ अबलेवर मोठे उपकार होतील. एकटी दुकटी अशा वेळीं जाऊं तरी कुठं? स्त्रियांना जास्त भीति. कुठं जाईन ह्मटलं तर सोय नाहीं. पुरुषांची गोष्ट वेगळी. पण माझ्यासारख्या यौवन-संपन्न स्त्रियेला ठेवून घेण्यास सर्व लोक कचरतात ह्मणून आपल्या चरणीं धांव घेतली आहे.

**सुदेष्णा**—( द्रौपदीकडे न्याहाळून पाहून ) अहाहा! हिच्या अप्रतिम सौंदर्यापुढें मला मान खालींच घातली पाहिजे. काय ही शरीरांची ठेवण, व काय हें तेज. हरिणकिशोराप्रमाणें चंचल व पाणीदार डोळे. चाफेकळीप्रमाणें सरळ नासिका, कुंद कळ्याप्रमाणें दंत असें कितीतरी वर्णन करूं? मी स्त्री आहे ह्मणून, नाहींपेक्षां जर कां पुरुष असतें तर यावेळीं माझी काय स्थिति झाली असती हें एक कवीच जाणे. अशा वेळीं या स्त्रीला पदरीं ठेवून, घेणं योग्य खरं पण पुढें मागें बळेंच पदरांत अग्नि बांधून घेतल्याप्रमाणें माझी अवस्था होणार. कारण—

॥ पद ॥

॥ लोण्याची सवत पहा खपत नसे युवति जना ॥ मत्सर हा प्रखर असे चैन पडुं न देइ मना ॥ ध्रु० ॥ अभिनव मधु लोलुपशा भ्रमरापरि नर असती ॥ एकस्थलिं कधिं नच हे प्रेमार्पण हें करिती ॥ नित्य नव्या यांस पहा आवडती प्रिय युवती ॥ टाकिल अंकीत करूनी पतिमानस ही ललना ॥ ध्रु० ॥

( आपल्याशीं ) सोन्याची सुरी पण उरीं कां खूपसून घ्यायची? नकोग बाई, विकतच भांडण घेऊन मग रडत बसण्यापेक्षां आतांच अर्धचंद्र देऊन मोकळं व्हावं हें बरं नव्हे कां ? ( उघड ) बाई, तुमच्या एकंदर स्थितीवरून मी आपल्या पदरीं तुह्माला ठेवून घ्यावं अशी माझी योग्यता नाहीं, याला माझा नाइलाज आहे.

द्रौपदी—( स्वगत ) ही बायको विलक्षण संशयी दिसते. मला पाहिल्याबरोबर ज्या पक्षीं ही चकित झाली त्या पक्षीं हिच्या मनांत संशयानें पूर्ण कल्लोळ करून टाकल्यासारखें दिसतें. मेली बायकांची जात मत्सरी खरीच. मोकळया मनाची बायको या जगांत एखादीच सांपडली तर नकळे. आणखी ज्या बायकांचं मन पतिविषयीं संशयीत असतं त्या बायका मोठ्याच तऱ्हेवाईक असतात. असो. आपल्याला गोड बोलून कार्यभाग कसा तरी साधला पाहिजे. ( उघड ) राणीसाहेब, मी तर सर्व भिस्त आपणावर ठेवून इथं आलें आहें. माझी निराशा न करितां आश्रय देऊन चरणाजवळ ठेवून घ्याल अशी आशा आहे. शेकडों दासीजन आपल्या सेवेंत तत्पर आहित त्यांतच या अभागिनीला ठेवून घ्यावी हेंच पदर पसरून मागणें आहे. भलते सलते तर्क विनाकारण घेऊं नका.

पद.

मनिं संशय हा धरितां कां ॥ भाग्यवंत भूपतिची दारा ॥

निःसंशय मज देइल थारा ॥ परि आशांकुर करपला खरा ॥ मारुं कुणा मी हाका ॥ ध्रु० ॥ कृपा करोनी दुःख निवारा ॥ पदरीं घेउनि द्या आधारा ॥ दीन युवतिच्या घ्या कैवारा ॥ सोडुनी द्यावी शंका ॥ ध्रु० ॥

**सुदेष्णा**—गडे निपुणिके, आमच्या सारख्यांच्या घरीं हिचा समागम कसा ग होणार ? प्रत्यक्ष सुरांगनांना लाजविणारी ही स्त्री, हिला मी कसला आश्रय द्यावा ? मला असें वाटतें, कांहीं तरी गुप्त मसलत योजून इथें आली असावी खास. हिनें आपली सर्व हकिकत सांगितली यावरुन माझा संशय जास्तच वृद्धिंगत होऊं लागला आहे. तापलेला सोन्याचा गोळा लालभडक व मनोहारक वरून दिसतो खरा, पण त्याला हातीं धरणं मूर्खपणा नव्हेका ? शिवाय तिकडची स्थिति तुला ठाऊक आहेना ? ( निपुणिकेच्या कानांत कांहीं सांगितल्याप्रमाणें करून ) मग तूंच सांग बरं हिला पदरीं ठेवून घेतल्यानें ही कधींना कधीं नाक ठेंचायला कमी करणार नाहीं. स्त्रियांच्या अंगीं जी स्वाभाविक मोहनीअस्त्रांची सामुग्री असते त्याच्यापेक्षां किती तरी पटीनें हिच्या अंगीं वसत असेल ?

पद.

मजहुनि ही शतपटिनें सुंदर दिसते रमणी ॥ शुष्क तृणासन्निध कां ठेविल वन्हीस कुणी ॥ अति सतेज वरुनि दिसे नयनातें हीरकणी ॥ परि प्राणा हरण करिल उदरीं जातांच क्षणीं ॥ पतिमानस तल्लिन ही टाकिल करुनी तरुणी ॥ मग मजला या भुवनीं सांग गडे कोण गणी ॥ ध्रु० ॥

**निपुनिका**—( स्वगत ) कोणी कां होईना, प्रत्येकजण आपलं हित पहात असतो. राणीसाहेब म्हणतात ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे.

ही चतुरिका हां हां म्हणतां महाराजांना अंकित करून घेऊन आपला शह बसवायला कमी करणार नाहीं. अर्थात् प्यायाचा फर्जी होण्याला कितीसा वेळ लागणार ! ही आमच्या राणीसाहेबांवर नक्षा ठेवील यांत संशय नकोच. असो, एखाद्याचं कल्याण करायला आपलं काय जातं ! ( उघड ) राणीसाहेब, आपण उगीच भलते सलते संशय घेऊं नका. मग आम्ही कशाला आहोंत ? हिचं नख दिसण्याची मारामार मग मुख कोठून दिसणार ? अनाथ आहे घ्या जवळ ठेवून. अहो पाण्याजवळ कमळं हीं असावयाचीं.

**सुदेष्णा**–तूं ह्मणतेस ह्मणूनच हिला जवळ ठेवून घ्यावीशीं वाटते. नाहींपेक्षां मग पहा बरं ? तूं राहशील नामानिराळी आणि फांस लागेल माझ्या गळयाशीं. असें होईल कदाचित. बाई तुमचें नांव काय ? आणखीं मी दासीजनांत ठेवून घेतलं तर तुम्हीं कामं काय करणार ?

**द्रौपदी**–राणीसाहेब, माझं नांव सैरंध्री. मी पूर्वी सत्यभामेची वेणीफणी करून असें. पुढें सत्यभामा राणीसाहेबांकडून निघून द्रौपदी-बाईच्या आश्रयाला राहिलें; परंतु तूर्त पांडव द्रौपदीसह वनवासाला गेल्यामुळें मी निराश्रित झालें आहें. उच्छिष्ट सेवन, व परपादसेवन या दोन गोष्टी अगदीं वर्ज्य आहेत. माझ्या अभिलाषाची कोणी इच्छा करिल तर गुप्तवेषानें असलेले माझे पती तात्काळ त्याचा प्राण घेतील. याच काय त्या माझ्या मुख्य अटी आहेत. बाकी हवी ती कामागेरी सांगा, ही दासी करण्याला तयार आहे.

**सुदेष्णा**–( आपल्याशीं ) बरं झालं बाई. माझ्या आतां जिवांत जीव आला. ( उघड ) तर मग खुशाल माझी वेणीफणी करून तूं रहा. आतां तुम्हांला माझ्या घरीं कोणत्याही गोष्टींची कमतरता पडणार नाहीं. माझ्या संशयाचें तुह्मी निर्मूलन केलंत ह्मणूनच तुला

मी आनंदानें पदरीं ठेवून घेतें. बाई, तुह्मींच विचार करून पहा. माझ्यासारखा तुह्मांला अनुभव नसेल, तरी पण बहुतेक स्त्रियांना या गोष्टींचा अनुभव येऊन चुकतो. अशा गोष्टीनं जगांत महान् अनर्थ घडून कुटुंब कलहानें राष्ट्रेंच्या राष्ट्रें उलथीं पडलीं आहेत. ह्मणून बाई भीति वाटत होती. आतां खुशाल रहा. फार काय सांगूं ! मी एक पळभर सुद्धां तुला विसंबणार नाहीं. तुझ्या अटी मला कबूल आहेत. जा, स्नान कर आणि थोडसं, कांहीं खाऊन घे. श्रीजगदंबेच्या दर्शनासाठीं तुला देखील घेऊन जाईन.

**निपुणिका**–राणीसरकार, आपल्या शिलाला योग्य तेंच आपण केलंत. श्रीमंत जर गरिबांचे उपयोगी न पडतील तर गरीब अनाथांचें संगोपन तरी कसं व्हावं ? बाई, चला लौकर, आटपा लौकर.

**द्रौपदी**–चला तुह्मीं पुढें व्हा. मी आलेंच पाठोपाठ.

( सुदेष्णा व निपुणिका जातात. )

भगवान रुक्मिणीरमणा, गोपालकृष्णा, प्रसंगविशेषीं दीन भगिनीची लज्जा संरक्षण केली आहेस तशीच पुढें कर, एवढीच तुझ्यापाशीं ओंवाळणी मागतें.

पद.

**अनाथनाथा रुक्मिणिकांता ॥ करुणघना आनंदनिधाना ॥ विसंबूं नको दीनं भगिनीला तव चरणांबुजिं हीच प्रार्थना ॥ कर्मगती पुढती मती कुंठित होऊन गेल्यावरती ॥ विसरुनि जाई मनुज भूवरी निमुटपणें सोसुनि अवमाना ॥ श्रीगोविंदा ॥ सौख्यानंदा ॥ दे नव छंदा ॥ भवभयभंगा ॥ हे श्रीरंगा ॥ संकट वारी॥ ताप निवारी ॥ श्रीहरि झडकरि ॥ दे वरदाना ॥धृ०॥**

अंक १ ला समाप्त.

# अंक २ रा.

( कीचक बहिणीच्या भेटीस आला आहे, दासदासी सेवेंत हजर आहेत, असा प्रवेश. )

**सुदेष्णा**—( सैरंध्रीस उद्देशून ) सैरंध्री, तुझी कुशलता पाहून मी अगदीं चकीत झालें आहें. अशी सर्वगुणसंपन्न स्त्री भूतलावर दुसरीकडे असेल असें मला वाटत नाहीं; जों जों तुझा सहवास मला जास्त होऊं लागला आहे तों तों तुझे सद्गुण मला जास्तच आवडूं लागले आहेत. टापटिप, पदार्थ बनविण्याची शैली अशा किती तरी गोष्टी सांगूं ? उघडच आहे; सत्यभामा, रुक्मिणी, द्रौपदी यांच्या सहवासांत असलेलीं माणसं चतुर असायचींच.

**सैरंध्री**—इतकी प्रशंसा करण्यासारखे गुण माझ्या अंगांत मुळींच नाहींत. उगीच आपली प्रशंसा करतां इतकेंच. मोठ्या मनाचीं माणसें अवगुण असला तरी गुण समजून सेवकांना उत्तेजन देतातच.

**कीचक**—( सैरंध्रीकडे न्याहाळून पाहून ) ( स्वगत ) या रमणीचा मुखचंद्रमा पाहून माझं अंतःकरण प्रेमानें उचंबळूं लागलं. हिनें आपल्या नेत्रकटाक्षानें मला विव्हळ केलं, असलें हें अप्रतिम स्त्रीरत्न माझ्या भगिनींनें आपल्या सहवासांत कधीं ठेवलं कोण जाणे ?

**॥ नेत्र दिपती रम्य युवती बघुनी कां असे ॥ सौदामिनि सम कामिनी चाकित करितसे ॥ ध्रु० ॥ ही सुदती ॥ हरुनि मती ॥ घेई किती ॥ महिवरती ॥ स्वर्गाहुनि अप्सराच उतरली असे ॥ शशिवदना ॥ प्रिय ललना ॥ अवलोकुनि अधिर मना ॥ मदनशरें शरीर पहा दहन करितसे ॥ ध्रु० ॥**

क्षुधिताला षड्रसान्नाचें भरलेलें पात्र पाहून जसा आनंद होतो किंवा स्वातिघन वर्षावाकरितां अतूर झालेल्या चातक पक्ष्यांची जशी अवस्था होते त्याप्रमाणें या मोहिनीनें मला मोहून टाकलं आहे.

**सुदेष्णा**—( कीचकाची स्थिति पाहून ) भाऊराया, तूं एका-एकीं असा बेहोश काय ह्मणून झालास ? असलें असह्य कोणतें दुःख तुला पीडा देत आहे मला सांग. अरे तुझी बहिण राजाची पट्टराणी असून तूं सचिंत काय ह्मणून होतोस ? मला सांग, काय पाहिजे ती वस्तु मिळणारी असतां तूं मौन धरतोस हें चांगलं का ?

**कीचक**—ताई, माझें दुःख उघड सांगण्याप्रमाणें नाहीं. त्याला एकांतवासच पाहिजे. या जवळ असलेल्या दासीजनांना जायला सांग मग मी सांगेन.

**सुदेष्णा**—बरं तर तुझ्या मर्जीप्रमाणेंच होऊंदे. निपुणिके, बकुले, सैरंध्री, तुह्मीं जराशा बाहेर जा. कांहीं जरूर पडेल तर हांक मारीन.

( दासी जातात. )

सांग आतां दुःखाचें कारण.

**कीचक**—ताई, शशिविरहित आकाशाप्रमाणें हा तुझा महाल अगदीं निस्तेज होऊन गेला. मला सांगायला शरम वाटते पण बोल-ल्यावांचून राहवत नाहीं. सैरंध्रीसारखं स्त्रीरत्न पाहून माझ्यासारख्या नवयौवनसंपन्नाला कां बरं नाहीं मोह उत्पन्न होणार ? ही जर मला प्राप्त करून न देशील तर परमेश्वरसाक्ष या कुडींत कांहीं प्राण राहणार नाहीं. हिनें आपल्या नेत्रकटाक्षानें मला विव्हल केलं. अशा कनक-लतेला तूं आपली दासी केलीस त्यापेक्षां माझ्यासारख्या नवयौवन-संपन्नाच्या पदरीं बांधली असतीस तर उभयतांचें कल्याण नसतें का

झालें ? ताई, आतां मात्र माझ्यानें मुळींच धीर धरवत नाहीं ! एक तर ती शुभानना मला प्राप्त करून दे नाहीं तर ही कट्यार माझ्या उरांत भोंसकून माझे पंचप्राण तरी घे.

**सुदेष्णा**—भाऊराया, असं वेड्यासारखं काय करतोस ? ती दिसण्यांत दासी आहे पण मी देखील तिची दासी शोभणार नाहीं एवढी तिची योग्यता आहे. उगीच भलत्यासलत्या नादांत पडूं नकोस. अरे, पति गंधर्व असून गुप्तरूपानें त्यांचा तिच्यावर पहारा आहे. तिला जर कोणी नुसता स्पर्श केला तर त्यांची जळून राखरांगोळी होईल. विनाकारण तुला आगींत उडी घालण्याची दुष्टबुद्धि सुचली. भलत्या सलत्या भानगडींत मी पडेन तर माझी उगीच बेअब्रू होईल.

**कीचक**—ताई, माझ्या प्राणापेक्षां तुझी अब्रू तुला जास्त वाटतेना ? अग या भाषणानें माझ्या आशांकूर कां दग्ध करतेस ? उगीच भीतीचें अवडंबर घालून माझें मन दुखवितेस हें चांगलं का ? अग स्वयंपाक तयार असून तो जर मुखीं पडत नाहीं तर त्या स्वयंपाकाचा व खाणाराचा काय उपयोग. मी झुरणीला लागून इहलोक सोडून गेल्यावर तुला आनंद होईल का ? अग हिऱ्याला कोंदणाची जोड करून दे.

॥ पद ॥

**॥ तळमळ मज लागुनि मन सतत जळतसे ॥ तिळभरही चैन नसे करुं तरी कसें ॥ ध्रु० ॥ आशन शयन पान यान ॥ नलगे मज मान पान ॥ स्मर खल मज देइ ताप ॥ म्हणुनी मन करि विलाप ॥ बंधुची लाज मनीं ॥ राहुंदे तुज प्रियभगिनी ॥ प्राणदान मजसि देइ विनंती ही ॥ ध्रु० ॥**

मग तिला दुःख व मला सुख यांत काय अर्थ ?

**सुदेष्णा**—कीचका, तुझें अनहित करावं अशी गोष्ट माझ्या स्वप्नांत तरी येइल का ? अरे, तुझी आशा मृगजलासमान आहे. मृगजलाला पाहून कोणाची तरी तहान भागेल का ? लहान तोंडीं मोठा घास घेणें चांगलं नव्हे. योग्यायोग्यतेचा विचार पाहून मग जें करणें ते कर. बिसतंतु हंसानेंच सेवन करावेत. आणखी मुख्य गोष्ट तुला सांगतें ती नीट ऐक—

॥ पद ॥

**॥ सुरी सोन्याची ॥ भेदील उरातें साची ॥ क्षार जलोद्भव सैंधव जरि तें ॥ परि जल त्या नाहींसें करितें ॥ तत्व हें मना काय शिकवितें ॥ परनारीची॥ लालसा नसे सौख्याची ॥ ध्रु० ॥ पतंग जैसा दीपावरती ॥ उडी घालुनी मरतो अंतीं ॥ त्यापरि होइल गति तव जगतीं ॥ उगिच मरणाची ॥ कां इच्छा धरिसि फुकाची ॥ ध्रु० ॥**

**कीचक**—ताई, मला वाटतें तुला भिकेचे डोहाळे आठवले. अग तुझा पती त्या चातकीवर ससाण्यासारखी झडप घालील त्या वेळेला तुझे डोळे उघडतील. अद्याप तूं भ्रमांत आहेस; नीट विचार कर. हातांतील बाण निघून गेल्यावर मग प्राण व्याकुळ झाल्यावर उपयोग काय ? सांगतों तें आतां तरी ऐकून घे.

॥ पद ॥

**॥ दासीचीं लुगडीं धुवुनी भगिनी तूं राहसी भूवरी॥**
**याची भीति पहा मला अतिशय गे वाटते अंतरीं ॥**
**मिष्टान्नें तुजला कधीं न मिळती खाया शिळ्या भाकरी ॥**
**राणीची बटकीच होशिल पहा मिथ्या नव्हे वैखरी ॥**

मग मलाही नाहीं तुलाही नाहीं घाल कुत्र्याला, अशी स्थिति

होऊन रडत बसशील. ( स्वगत ) आतां उलटा फांसा टाकल्यावांचून का माझा कार्यभाग तडीला जाणार आहे ?

**सुदेष्णा**—( स्वगत ) याचें ह्मणणें मला एकपरी खरें वाटतें. हा ह्मणतो त्याप्रमाणें पुढें मागें माझी अवस्था होण्याचा संभव आहे खरा. तेव्हां परस्पर गळ्यांत घोरपड अडकावून द्यावी हें यावेळीं योग्य दिसतें. या पुरुषांचा विश्वास कुणी धरावा ? नकोग बाई, अगोदर स्वार्थ आणि मग परमार्थ. ( उघड ) बंधुराया, तुझ्या हितासाठीं चार उपदेशाच्या गोष्टीं तिला सांगून मी कांहींतरी निमित्तानें तिला तुझ्या महालांत पाठवून देतें. मग तुला काय वाटेल तें कर. उगीच माझ्या माथीं तुझे अभिश्राप नकोत.

**कीचक**—अहाहा ! ताई, तुझ्या अमृतरूपी वाणीनें माझ्या देहांत प्राण संचार करूं लागला. आतां मी जातों. तूं असेल तितकी अक्कल खर्च करून तिचें मन वळीव व तावडतोब मंदिरांत पाठवून दे. मी अगदीं जय्यत तयारी करून चातकाप्रमाणें तिची मार्गप्रतिक्षा करीत बसतों.

### पद.

**॥ वेड मला लावियलें सैरंध्रीनें ॥ कमाल केली वि-रंचीनें ॥ अति सुमनोहर सुंदर ललना ॥ मच्चित्ता रमवोनी ॥ घेइल जिंकोनी ॥ हृदय वेधिलें पहा तिनें ॥ ध्रु० ॥**

( असें ह्मणून जातो. ) ( सुदेष्णा प्रवेश करते. )

**सुदेष्णा**—( विचार करून ) कोणत्या प्रकारें सैरंध्रीचें मन वळवावें हें कांहीं सुचत नाहीं. ती बायको मोठी खंबीर मनाची दिसते. आतां मी अंतर्यामीं पुष्कळ मनाचे मांडे खातें तरी तिकडची डाळ तिथें शिजेल कीं नाहीं याची वानवाच. उघडच

आहे. तिला भोहनी पडण्यासारखं आमच्या वाड्यांत एकतरी मनुष्य आहे का? सुरम्य वस्तूंवर कुरुपाचें मन जातें पण सुरुपाचें मन कुरुपांवर कसं जाणार? तेव्हां एका गोष्टीचा उलगडा झालाच. ती मोठीच चतुर, शहाणी, माझा मतलब ती तेव्हांच ओळखील. सुतानें स्वर्गाला जाणारी ही बायको माझ्या मोहजालांत गुंतण्याचें नांवच नको. असो, खडा टाकून पहावा. लागला तर ठीकच. नाहीं पेक्षां मग काय होईल तें होईल. कोण आहे ग तिकडे? निपुणिके, अग निपुणिके. ( निपुणिका प्रवेश करते. )

निपुणिके, सैरंध्रीला इकडे पाठवून दे आणखी तूं जरा बाहेरच बैस.

**निपुणिका**—आज्ञा ताईसाहेब. ( जाते. ) ( सैरंध्री येते ).

**सुदेष्णा**—बाई सैरंध्री, आलीस, ये बैस अशी जवळ; हें पहा, तुझी मला अतिशय कींव येते, तुझ्यासारख्या मनमोहिनीवर दुर्दैवानें अशा दास्यत्वांत दिवस घालविण्याचें आल्यामुळें मेल्या या काळाचा मला अतिशय संताप आला आहे. पण काय करूं? होईल तेवढं शक्तीनुसार तुझं बरं करणं एवढंच माझ्या हातीं आहे, ईश्वर तुला लौकर सुखाचे दिवस दाखवो ह्मणजे झालं.

**सैरंध्री**—(स्वगत) काळसर्पिणी, तुझ्या गोड गोड भाषणाचा मतलब मला पूर्णपणें कळून चुकला आहे. कचाट्यांत सांपडलें आहें खरी. माझा साहकारी श्रीकृष्णपरमात्मा समर्थ आहे. (उघड) राणी-सरकार, पूर्वसंचित क्रियमाण ज्याचें त्यानें भोगलें पाहिजे. सर्व गोष्टींची अदलाबदल करतां येईल. पण भोक्तृत्वाची अदलाबदल कुणाच्याही हातून होणार नाहीं. अशा खडतर काळांत मला आपण जीवदान देऊन जीव कीं प्राण समजतां हें थोडं कां झालं?

**सुदेष्णा**—खरोखर, तुझ्या सारखी समजूतदार बायको विरळाच; आमचें मोठें भाग्य ह्मणून तूं आमच्या घरीं चालून आलीस.

**सैरंध्री**—(स्वगत) सटवे, तुझं कवटाळ मी पूर्णपणीं जाणून आहें. असो. (उघड) बरं मला बोलावण्याचें कारण काय ? पाल्हाळ पुरे नाहीं का झाला ?

**सुदेष्णा**—( स्वगत ) स्वतःचा स्वार्थ साधून घेण्यासाठीं मला मुखाचें नरककुंड करावं लागणार. याबद्दल मला वाईट वाटतें खरं पण मी तरी काय करूं ? इकडे भावाची निराशा करीन तर पुढें मागें माझ्या सुखाची मधल्यामधेंच खाक होईल. करूं तरी काय ? एकीकडे आड व एकीकडे विहीर असें मला झालं आहे. (उघड) बोलावण्याचें कारण हेंच कीं, आज तुझ्या हातचे गोड गोड पदार्थ खावेत अशी मनापासून इच्छा आहे. हें पहा, माझ्या जिव्हाळ्याचें ह्मणशील तर या जगांत एक काय तो कीचक आहे. तेव्हां म्हटलं त्याला थोडासा प्रसाद मिळेल तर दुधांत शर्करा पडल्याप्रमाणें होईल. तूं माझी म्हणून मी तुझ्यापाशीं निःशंकपणानें बोललें; जा. आटप लौकर. तुझी मी आपल्या भावापाशीं अतिशय प्रशंसा केली ह्मणून म्हणतें. शिवाय स्वतः त्याच्या महालांत ताट घेवून गेल्यावर तो तुला काय बक्षिस देईल हें जरी मी सांगूं शकत नाहीं तरी तो मनाचा उदार असल्यामुळें अमोलिक नजराणा तुला देऊन संतुष्ट करील एवढं खरं.

**सैरंध्री**—(स्वगत ) शिव ! शिव ! प्रत्यक्ष राजाची बायको कुंटणपणा करूं लागल्यावर मग बोलायचें काय राहिलें ? भगवान सूर्यनारायणा, तुझ्या प्रळय काळच्या तेजानें अशा पापिणी स्त्रियेचें एकदम भस्म करून टाकूं नकोस. अर्धवट जळून मग या दुष्टेच्या देहांत किडे पडून त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विषारी हवेनें हिचे श्वास बंद कर. म्हणजे हिच्या कृतकर्माचीं फळें भोगण्यास ठीक पडेल (दांतओंठ चावून) जारिणी, काय करूं; हा उच्छृंखल

होण्याचा समय नव्हे--नाहीं पेक्षां तुला असा नजराणा दिला असता कीं, जन्मजन्मांतरीं तुला त्याची आठवण राहिली असती. ( उघड ) राणीसरकार, मी आपल्याला कांहीं सांगेन त्याचा राग नाहीं ना येणार ?

**सुदेष्णा**--बाळ, तुझ्या बोलण्याचा मला कधीं राग येणार नाहीं. खुशाल बोल--

## पद.

**सैरंध्री**—

**द्याच मला चुडेदान ॥ तुह्मी हें ॥ या दासीचा असो अभिमान ॥ धृ० ॥ त्वत्बंधुमन निर्मल न दिसे ॥ ह्मणुनिच सविनय विनंती करिते ॥ धृ० ॥ मजवर त्यांची पापी दृष्टी ॥ अतिशय आहे ह्मणुनि मजसिं न धाडा ॥ धृ० ॥ पातिव्रत्यावरती घाला ॥ घालुनियां भ्रष्ट मजसि करिलचि बाई ॥ धृ० ॥**

**सुदेष्णा**—खुळी नाहीं तर कुठची. भलतेच कांहीं तरी तर्क काढतेस.

## पद.

**करिल कसा तव घात सुंदरी ॥ करिल ॥ धृ० ॥ मत्बंधू नच निष्ठुर ऐसा ॥ न करिल कधीं आघात तुजवरी ॥ धृ० ॥ एकांताची भीती न धरी ॥ रक्षिल तुज इंदिराकांत गे ॥ करिल ॥ धृ० ॥**

**सैरंध्री**—( करुणस्वरानें ) राणीसरकार, तुमचें म्हणणें ठीक आहे. पण पांची बोटं कधीं सारखीं असतात का ? आपला तो भाऊ खरा. पण तो तुमच्या सारखा शुद्ध अंत:करणाचा मला दिसत नाहीं. हा दृष्टीदोष म्हणा अगर कांहीं म्हणा. पण—

पद.

॥ भूवरी केसरी करी ॥ गवसल्यावरी ॥ कधिं न त्या सोडी ॥ तात्काळ तयाचें गंडस्थळ तो फोडी ॥ धृ० ॥ क्षणोक्षणीं पिउनी वारुणी ॥ जगतिं साजणी ॥ मदांध नर होती ॥ निःशंकपणानें खून नीतिचा करिती ॥ चाल ॥ ऐकगे विनती नृपराणी ॥ सन्मती ॥ धाडीं न बांधवागारीं ॥ मजप्रती ॥ देऊनि गरल मज नारी ॥ भूवरी ॥ वैखरी ॥ मानही खरी ॥ सुदती अंतरीं ॥ धरुनि मम माया ॥ दीन दासीची अब्रु वृथा नच दवडी ॥ धृ० ॥

**सुदेष्णा**—जों जों लाड करितें तों तों तूं आपली डोक्यावर बसूं पहातेस! तें कांहीं नाहीं. मी सांगेन ती गोष्ट तुला ऐकलीच पाहिजे. आणखी तो माझ्या करितां उंची मद्यें देईल तीं घेऊन ये जा लौकर.

**सैरंध्री**—( दुःखाचा सुस्कारा टाकून नम्रपणानें ) मी हवा तेवढा स्वयंपाक करीन; दुसऱ्या पुष्कळ दासी आहेत त्यापैकीं कुणा-ला तरी ताट घेऊन जायला सांगा. पण विनाकारण माझा पाति-व्रत्यभंग कृपा करून टाळा.

पद.

॥ व्याघ्र मुखामधें लोटुनी हरिणी ॥ बळेंचि देसी कांगे नृपरमणी ॥ धृ० ॥ विनवितसे तुज जोडुनी पाणी ॥ बंधु हितास्तव न करि दुष्करिणी ॥ धृ० ॥ दीन दासीची असासि स्वामिणी ॥ कींव नये कशी तुज अजुनी ॥ धृ० ॥ अवलोकुनि तुज देवी धरणी ॥ भंगुनि जाइल निष्ठुर तरुणी ॥ धृ० ॥ कुठें लपला तो

तेजस्वि तरणी ॥ शरण येतसे किंकरी चरणीं ॥ धृ० ॥

**सुदेष्णा**—( रागानें ) आणखी डोकं जरी फोडून घेतलंस तरी मला तिळभर देखील दया यायची नाहीं. सांगितलेली गोष्ट जर न ऐकशील तर तुझा परिणाम काय होईल तें नीट ध्यानांत धर. कांहीं कुणाचें डोकं उडवायला सांगत नाहीं कांहीं नाहीं. माझ्या अब्रूची मला कांहींच का चाड नाहीं ? तो तुझ्या केसाला देखील धक्का लावणार नाहीं. अग भाग्यवानाच्या पदरीं मी तुला बळेंच घालीत असतां तूं धिक्कार करतेस तेव्हां तुझं दुर्दैव, दुसरं काय ? जा. हवं तें कर. मी माझं वचन पुरं केल्या वांचून कालत्रयीं देखील सोडणार नाहीं. ( रागानें जाते. )

**सैरंध्री**—( आकाशाकडे दृष्टी लावून ) भगवान् सूर्यनारायणा, गोपाळकृष्णा, आतां माझा सर्व हवाला तुझ्यावरती आहे.

पद.

॥ द्रुपद सुता मी ॥ श्रीहरि भगिनी ॥ पांडव नृपजाया ॥ संकटकालीं न कोणिच वाली अघटित ईश्वरी माया ॥ खेळ असति हे दुर्दैवाचे दोष कुणासि न द्यावा ॥ ज्याचा त्यानें कर्मभोग हा जगतीं उपभोगावा ॥ दैव फिरे त्यावरि जग घसरे धीर मुळिं न सोडावा ॥ दुष्ट अरि मज भ्रष्ट नच करी हीच विनंती देवा ॥ करुनि अग्निमुखिं घालितसे उडी राखी निर्मल काया ॥ धृ० ॥

( सैरंध्री वरील पद म्हणत म्हणत प्रवेश करते. )

( दुःखाचा सुस्कारा टाकून ) देवा, गोपालकृष्णा, प्रत्यक्ष तूं प्राणापेक्षां पलीकडे मानलेल्या प्रिय भगिनीवर असा दुर्घट प्रसंग आला असून तूं देखील डोळे मिटून स्वस्थ बसलासना ? पदोपदीं

या वेळीं मला जें दुःख होत आहे. यापेक्षां सती जाण्याचा प्रसंग जरी मजवर आला असता तरी मला त्याचा विषाद वाटला नसता. आतां मला अनितीच्या रखरखलेल्या जाळींत जावं लागणार. त्यापेक्षां सूर्यनारायणा, तूं आपले द्वादशनेत्र उघडून माझी राखरां-गोळी कां करून टाकित नाहींस? धरणीदेवी, तुला जडभार झालेल्या दुर्दैवी कुमारीला आपल्या उदरीं कां बरं घेत नाहींस? मी किती जरी आक्रोश केला तरी माझं समाधान या वेळीं कोण करणार! ही कालरूपी निशा मला गिळून टाकील तर चांगलें नाहीं का होणार? पण ती देखील या वेळीं अगदीं सचिंत होऊन बसली आहे. वायो, तूं माझ्या कर्मगतीचे खेळ पाहण्यासाठीं आपलें चलनवलन बंद करून नाहीं ना बसलास? माझे पूर्वज मात्र या वेळीं स्वर्गाहून माझी दुःस्थिती पाहून टपाटप अश्रू टाकित असतील. असो. जरी यावेळीं माझ्या नाड्या आखडत चालल्या आहेत तरी मला त्या कृतांतस्वरूपी कीचकाच्या महालांत गेल्यावांचून गत्यंतर नाहीं. सूर्यनारायणा, जरी तूं यावेळीं भूतलाच्या दुसऱ्या भागावर प्रकाश पाडित आहेस तरी तुझी सेवा तेजरूपानें मला या निबिड अंधः-कारांतून पार पाडो. ( जाते. )

---

## प्रवेश २ रा.

( कीचकाचा महाल–कीचक मार्गप्रतिक्षा करीत बसला आहे. )

**कीचक**—( आनंदानें ) आज माझ्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. शाबास भगिनी, या तुझ्या उपकृतीबद्दल मी आपला प्राण दिला तरी कमीच होईल. आज त्या सुंदरीसमवेत हा भाग्य-वान कीचक आजची शुभरात्र रतिविलासांत घालविणार.

( सैरंध्री येते तिला पाहून )

अहाहा! या रमणीचा माझ्या महालांत प्रवेश होतांच जिकडे

तिकडे दैदीप्यमान प्रकाश पडला. सर्व पृथ्वींतला सुगंध एकत्र होऊन त्याच्या परिमलानें माझें मंदिर दणाणून गेलें. बा विरंची ! तूं आपल्या कौशल्याची परमावधी केलीस.

॥ पद ॥

**किति नाजुक तनु मनहारिणी दिसते अंगना ॥ पाहु-
नियां शशिवदना ॥ भ्रम पडे मना ॥ धृ० ॥ तेजोमय
सुंदरी पाहुनी ॥ जाती मन्नेत्र दिपुनी ॥ विधिघटनेची
पहा साक्ष दे मना ॥ धृ० ॥ अवलोकुनी सुंदर ललना॥
स्फूर्ति येइ मदना ॥ अधिर मना पूर्ण करोनी घेई
कामना ॥ धृ० ॥**

**सैरंध्री**–( पुढें होऊन ) महाराज, हें पक्वान्नपात्र राणीसरकारनीं आपल्याकडे पाठविलें असून आपल्याकडून सर्वोत्कृष्ट मदिरा आणण्याबद्दल त्यांची मला अनुज्ञा झाली आहे. यासाठीं काय द्यावयाचें तें देऊन मला कृपा करून निरोप द्यावा.

**कीचक**–( सैरंध्रीजवळ जाऊन विनयानें ) भाग्यवती, आज या भाग्यवानाची तूं पट्टराणी होऊन मला आपल्या पदरांत घ्यावें हीच मला देणगी दे. आतां तुला काय कमी आहे. पहा तर खरं, आज सर्व भूमंडलावर ऐश्वर्यसुखाचा ठेवा या कीचकाला सांपडला आहे.

॥ पद ॥

**थाटमाट बघुनी घेईंगे सकुमारी ॥ अमराधिप प्रिय
सुदती लाज धरि न अंतरीं ॥ विभवशाली होइ नारी ॥
॥ धृ० ॥ पदरिं घेऊनि मंजसि सुमती नम्र दास क-
रुनि घेइ सुंदरी भूवरी ॥ सुनेत्र कटाक्ष टाकिं मज-
वरी ॥ धृ० ॥**

**सैरंध्री**-सेनापते, मी आपल्या भगिनीची दासी. आपली केवळ बटिक. बटकीवर आपल्यासारख्यांनीं अनुरक्त होणं चांगलं नव्हे. सिंहानें बकरीवर झडप न घालतां गजगंडस्थळ फोडणें हेंच योग्य. आपल्या वैभवाला शोभेल अशा रमणीला प्रेमार्पण न करितां भलतीकडेच तें करणें ह्मणजे समुद्रांतील पर्जन्यवृष्टीप्रमाणें निष्फळ नव्हे का ? आपणासारख्या सूज्ञ पुरुषांना मी सांगावं अशांतला कांहीं प्रकार नाहीं.

**कीचक**-मनोहारिणी, सर्व जगांतील राजांगना जिला दासी सुद्धां शोभणार नाहींत अशी तुझी योग्यता असतां तूं आपल्याकडे कमीपणा घेतेस हा काय ह्मणून ? इतका मी अरसिक नाहीं. भलत्या सलत्यांवर हा सूज्ञ कीचक कधींही अनुरक्त होणार नाहीं. सुंदरी, तुला पाहिल्याबरोबर—

॥ पद ॥

**अनिवार मदन संचार जाहला मदंतरीं ॥ करि यास तूं शांत सखये सुमंदिरीं ॥ धृ० ॥ ऐश्वर्य असें नाहीं कोठें महिवरी ॥ भीड मनिं न ठेवी सकुमारी सुंदरी ॥ राजा असे दास माझा खरोखरी ॥ पदरांत घेई नारी दासास सत्वरी ॥ धृ० ॥**

खरं अनुरक्त होण्याचें साधन मधुकराला कमलिनीवांचून कोणतें आहे.

**सैरंध्री**-(रागानें)

॥ पद ॥

**दुष्टाचे वच कर्णा भेदुनी जाती ॥ मदांधास लज्जा नसते विभवाची या होइल तव कीं माती ॥ धृ० ॥ तुझ्या नरडीचा घोंट घेऊनि राखिन सुव्रत आपुलें**

**नीचा अंतीं ॥ स्त्री चरित्र प्रभवाग्नीनें दुष्टाची ये खंती ॥ धृ० ॥**

मदांधा, या भयंकर कालाच्या जबड्यांत तूं असून आपल्या वैभवाची शेखी मिरवितो आहेस हें तुझें केवढें अज्ञान ? अरे, जिवित्व क्षणभंगुर असतां तूं आपल्या वैभवाची घमेंड मारून फुशारकी मारतोस, व अधिकार मदानें धुंद होऊन परस्त्रीवर जबरीनें झडप घालण्याची इच्छा धरतोस तेव्हां तुझ्यासारखा शतमूर्ख या भूमंडलावर दुसरा कोणी नसेल. अरे तूं मला अनाथ असें समजत असशील तर तुझी मोठी चूक आहे.

॥ पद ॥

**ब्रह्मांड गोलांत करितील आक्रांत ॥ काळाहुनी प्रबल आहेत मत्कांत ॥ प्राणांत निमिषांत करितील निभ्रांत ॥ दुष्टा तुझ्या हृदयीं जडली कशी भ्रांत ॥ परनारीचा छंद घालील नरकांत ॥ भूमीवरी मज न कोठेंच एकांत ॥ धृ० ॥**

**कीचक**—हा खुळे, पतीची भीति मला कशाला घालतेस ? महाबलवान् हनुमान असो अगर वृकोदर असो, त्यानां सुद्धां हा कीचक् मृत्तिका चारील. विधिसूत्र चुकलें म्हणून हा योगायोग घडून आला. आतां माझ्यावांचून तुझ्या अंगाला स्पर्श करण्याची कुणाची छाती आहे. या सुंदर रतिवर अनुरक्त होणारा एक कीचक होय. ही शुक्राची चांदणी. याची अद्याप तुझी कल्पना चुकीची म्हणूनच माझ्याबद्दल तूं अज्ञपणानें माझा धिःकार करतेस हें मला समजत नाहीं असें नाहीं. पण स्त्रियांच्या अंगीं असणाऱ्या नैसर्गिक लीला तुझ्यामध्यें मला फारच दिसून येतात. या तुझ्या अल्लडपणानें तूं मला वेडा करून टाकलंस.

॥ पद ॥

॥ रमणिय स्वरूप हृदयीं रमलें ॥ ह्मणुनीयां माझें मन बावरलें ॥ मन बावरलें ॥ वेड लावियलें अभिनव सखये हृदय दुर्गाला ॥ भेदुनी जाती या समयाला ॥ त्राण न शरिरीं कीं उरलें ॥ धृ० ॥

**सैरंध्री**—मदांधा, दिवा मावळतांना त्याची जोत जशी जास्त प्रज्वलित होते तद्वत तुझीं स्थिति झाली आहे. तुझ्या पातकाचा घडा भरत आला त्याला तुझा इलाज काय ? अरे, जो इंद्रियाधीन झाला तो वीर कसचा ? ज्याला आपलं मन ताब्यांत ठेवतां येत नाहीं तो दुसऱ्यावर काय ताबा ठेवणार ? यासाठीं मी हिताची गोष्ट सांगतें ती नीटपणें ऐक.

॥ पतिकोप अनिवार मारील तुज ठार ॥ सोंडून दे नाद मुकशील घरदार ॥ सिंव्हापुढें काय जंबुक करणार ॥ नरकांत घालील तुजला परद्वार ॥ यमयातना तुजसिं करतील बेजार ॥ यदुवीर तो करिल मदुःख परिहार ॥ नरकांत पडतात अंतीं कुलांगार ॥ सद्‍बोध हा तुज कडुनि घडवो सदाचार ॥ धृ० ॥

**कीचक**—अग तुझ्या या सद्बोध मंत्रानें स्मरसंचार थोडाच शमणार आहे ? तुडुंब भरलेल्या जलाशयाप्रमाणें तो जास्तच उताला येऊं लागला आहे. स्वाति घनजल बिंदु चातकीच्याच मुखांत पडावयाचे ?

**सैरंध्री**—( रागानें )

पद

जिव्हेची तव कशि अजुनि राख ॥ होईना सति शाप खचित तव खला झडकरि करिल नाश महिवरी

**करी न मद उगाच ॥ क्षणभंगुर तव विभव पाहुनी ॥ येइ खला तव कींव मनीं ॥ सति छलचि घात तव करिल खास ॥ धृ० ॥**

अरे तुझ्यासारख्या कावळ्याला विष्टाच मिळायची ? तूं हंस थोडाच आहेस. बिसतंतूचा फराळ व मौक्तिकाचें भोजन त्यानेंच करावें. नीचा, मर्यादातिक्रम करशील तर बत्तीशीच रंगवीन. तूं खूप समजून ऐस. मी प्रत्यक्ष सिंव्हाची मादी आहें. तुझ्या पापी शरीराची ज्यावेळीं वाताहात उडवीन त्यावेळीं माझ्या अंगीं काय प्रभाव आहे हें तुला कळून येईल. ( कीचक जवळ येतो असें पाहून ) खबरदार माझ्या पवित्र शरिराला स्पर्श करशील तर.

**कीचक**—( विनयानें हांसून ) जितकी तूं संतापानें लाल होते आहेस तितकी मला एकाद्या सुंदर व लाल मदिरेप्रमाणें रमणीयच दिसत आहेस. साध्याभोळ्या युवतीपेक्षां क्षुब्ध झालेली कोमलांगीच मला आवडते. सध्यां रागामुळें तुझें रक्तवर्ण झालेलें मुखकमल पाहून मला जास्तच आनंद वाटतो. या पोवळ्यासारख्या रसरसित अधरामृताचें पान माझ्यावांचून कोण करणार आहे ? या सर्व ऐश्वर्याची व जिवित्वाची स्वामिणी तूंच आहेस. तुझें संतापयुक्त भाषण मला फारच आवडतें. सारांश आतां सर्व कांहीं तूंच आहेस. ये अशी जवळ ये तर खरी. अल्लडपणा किती ग करतेस ? ( सैरंध्रीचा हात धरून तिला ओढतो. )

**सैरंध्री**—( हात झिडकारून ) अधमा, घे तुझ्या कृतीचें प्रायश्चित. ( तोंडात मारते. )

( इतक्यांत राक्षस प्रवेश करून कीचकाला बुक्या मारतो. )

**कीचक**—अहाहा ! अशा आणखी पांचपन्नास मिळतील तर कमीच होतील. किती मऊ व गोंडस हात, जशी कांहीं मखमा-

लच. तुझी सुंदर प्रतिमा घडविण्यांत परमेश्वरानें इतर मानवजातीबद्दल मोठा पक्षपात केला असावा. बरोबर आहे. तुझी प्रतिमा घडविण्यांत त्याचं सर्व चातुर्य खर्च झालं तर इतर मानवजात कुरूप दिसावी यांत नवल नाहीं. जसें कोमल करांनीं ताडन केलेंस तसंच नाजूक पदकमलांनीं ताडन करून हें ठणकत असलेलें शरीर नरम करून टाकलंस कीं कृत्यकृत्य होईन. रागानें मला कधींच सोडलं आहे. पण तूं मात्र अनुरागानें या तप्त जिवाचें समाधान कर कीं झालं. ( जवळ जाऊन हात धरूं लागतो. )

[ इतक्यांत पुन्हा राक्षस कीचकाला लाथ मारतो. ]

**सैरंध्री**–( संतापानें ) निर्लज्जा, चांडाळा, कुलकलंक्या, भरलों तुझ्या पातकाचा घडा.

( लोटून देते. कीचक राक्षसाच्या लाथेनें जमिनीवर पडतो. )

**कीचक**–महाबलवान मल्लाची शक्ती, ज्या कीचकाचें एक पाऊल मागें सारण्याला असमर्थ त्या कीचकाला या यःकश्चित स्त्रियेनें फुलाप्रमाणें लोटून द्यावं का ? या स्त्रियांच्या अंगीं परमेश्वरानें केवढी तरी जादू भरली आहे. ( उठूं लागतो तोंच पुन्हां पडतो. ) ओय, ओय, ओय, माझ्या कमरेंतील हाडांचा चुराडा झाला. अरे माझ्या श्रीमुखांत कोणी मारली. कांदे उपटल्याप्रमाणें माझे केंस कोण ओढतो आहे. अग आई, आई, आई, मला गळफांस कोणी लावला ? सोडा, सोडा, देवा, मेलों, मेलों मेलों.

( निचेष्टीत पडतो ) ( राक्षस प्रवेश करून )

**राक्षस**–( हात जोडून ) देवी याज्ञसेनी, भिऊं नकोस. तुझ्या साह्यासाठीं मला श्रीसूर्यनारायणानें पाठविलें आहे. मी गुप्तरूपानें तुझ्या सन्निध राहून तुझ्या शत्रूंपासून तुझें रक्षण केलें आहे. जा. आतां मला त्यांचे आज्ञेप्रमाणें पुन्हां परत गेलें पाहिजे. ( जातो. )

**सैरंध्री**–चांडाळा, तात्काळ मरण थोडंच येणार आहे तुला ? चांगले तुझे हालहाल होऊन मग तूं मेला पाहिजेस. ( जाऊं लागते तोंच कीचक—)

**कीचक**–( सैरंध्रीला धरण्याविषयीं उठण्याचा प्रयत्न करूं लागतो ) अग चांडाळणी, या कीचकाला फसवून तूं कुठं जाणार आहेस ? पाताळांत अगर स्वर्गांत जा. कुठेंही गेलीस तरी हा कीचक तुझा उपभोग घेण्याला प्राणांतहि पाय मागें घेणार नाहीं.

( धडपडत जाऊं लागतो. )

( सैरंध्री जाते. )

( दांत ओंठ चावून ) माझे पायही जमीन गिळूं लागली कीं काय असें मला वाटतें. ही भूतचेष्टा तर नसेल. एकाएकीं माझ्या शक्तीचा ऱ्हास काय ह्मणून होऊं लागला ? अरेरे, या यमयातना आतां सोसवत नाहींत. लोखंडाच्या तापलेल्या सळयांनीं मला कोण बरं डागण्या देत आहे ? करूं तरी काय ? मती गुंग होऊन गेली. हा गुप्त भारा माझ्यानें सहन होत नाहीं. माझं काळीज तुटलं गेलं. शरिरांतील नाड्या आंखडत चालल्या. कांहीं चिंता नाहीं. अशी जरी माझी स्थिती झाली आहे तरी त्या मदनपुतळीचा उपभोग घेऊन मगच मरेन. जाणार कुठें माझ्या सपाट्यांतून ? हा पहा आलोंच तुझ्या पाठोपाठ धांवत.

( धडपडत भूमीवर पडत जातो. )

**अंक २ रा समाप्त.**

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

( विराट राजा, कंक, मंत्री व परिचारक असा प्रवेश. )

**विराट**—( आनंदानें ) आर्य कंक भटजी, तुमच्या बल्लवानें मोठी मर्दुमकी दाखवून माझ्या राज्याची अब्रू बचावली यासाठीं योग्य पारितोषक देऊन त्याचें भर सभेंत अभिनंदन करावें अशी माझी मनापासून इच्छा आहे. भूमंडलाला भारी झालेल्या अशा अजिंक्य जिमूती मल्लाला ज्यानें चीत केलें त्याच्या पराक्रमाचें किती ह्मणून वर्णन करावें. पहाडासारख्या धिप्पाड मल्लाचा ज्यानें एका मुष्टी-प्रहारानें चूर केला त्याच्या शक्तीचें किती ह्मणून कौतुक करावें. एवढा थोरला सेनापती कीचक बलवान् पण जीमूताचें नांव ऐकतांच भीतीनें वारुळांतील भुजंगाप्रमाणें दडी देऊन बसला. धन्य बल्ल-वाची, खऱ्या मातेचें दुग्ध प्राशन करून तिच्या उदरीं आल्याचें चीज करून दाखविलें.

**कंक**—राजा विराटा, तुमचें म्हणणें अगदीं यथार्थच आहे. शूरांनीं शूराचें अभिनंदन करणें यथार्थ आहे. ज्या राजाला गुणाची परिक्षा नाहीं तो राजा कसचा. खुराख खाऊन नुसत्या पोकळ ऐटी दाखविणारे बेगडी मल्ल जिमूताच्या कुस्तीच्या वेळेला अधो-वदन करून बसलेले आपण नाहींका अवलोकन केलेंत. राजा, या बल्लवाच्या पराक्रमावर पांच पांडव देखील खुष असत. भीमाला हा अगदीं जीव का प्राण वाटत असे. तूं याला पोटभर खायाला घालणारा भेटलास या वरून बल्लवाचें नशीब मोठें बलवत्तर आहे असें मी समजतों. नाहीं पेक्षां तो काय करता. राजा, मल्ल, हत्ती

आणि कन्या या तिघांना पोसणारा पुरुष मोठ्याच उदार मनाचा लागत असतो.

**विराट**—कंकभटजी, राजा धर्माशीं तुमचा विशेष संबंध असल्यानें तुमच्या प्रत्येक भाषणांत कांहींना कांहीं तरी नवी खुबी दृष्टोत्पत्तीस येते. असो. द्वारपाला, बल्लवाला इकडे लौकर बोलावून घेऊन ये.

**द्वार०**—जी सरकार. [ असें ह्मणून निघून जातो. ]

**कंक**—राजा, तुझ्या सारखा गुणी आणि उदार असा महात्मा भूतलावर क्वचित् असेल. कारण पांडवांच्या वनवासामुळें आम्ही त्याचे आश्रीत विपत्तीनें गांजलों असतां तूं उदार अंत:करणानें सर्व आश्रितांस मोठ्या उदार मनानें वागवून घेतोस, हा तुझ्या मनाचा केवढा तरी मोठेपणा. ( बल्लव प्रवेश करितो, राजाशिवाय सर्व लोक उत्थापन देतात. )

**विराट**—बल्लवा, असा जवळ येऊन माझ्यापाशीं बैस. तूं एवढा कांहीं पराक्रम केला आहेस कीं त्याचें वर्णन करण्यास माझी वाणी असमर्थ आहे. शाबास धन्य तुझी. मातेच्या उदरीं जन्म घेऊन तिचें सार्थक केलेंस. आज तुझ्या योग्यतेनुरूप जरी माझ्या हातून सन्मान होण्यासारखा नाहीं तत्रापि भरदरबारांत तुझा गौरव करावा असें माझ्या मनांत आहे.

**बल्लव**—राजाधिराज, या तुमच्या भाषणानें माझा आपण एवढा मोठा गौरव केला आहे कीं आज प्रत्यक्ष धर्मराजाची आठवण करून दिलीत. माल, मसाले खायाला घालणारा राजा सुदैवानें मला मिळाल्यावर मी तरी आपलें शक्तिनैपुण्य कुठें दाखवावें.

**विराट**—मंत्री, तो मल्लाचा पोषाख आणि सुवर्णाची गदा इकडे घेऊन या. ( मंत्री घेऊन येतो ) बल्लवाचें मानाचें पान म्हणून तुझा

आदर करीत आहे, त्याचा आनंदानें स्वीकार कर. ( बल्लव पोषाख धारण करतो, राजा त्याचे हातांत गदा देतो ). बल्लवा, आतां खुशाल तीन त्रिकाल खाऊन माझे जवळ राहात जा. आतां स्वयंपाक वगैरे करण्याचें कांहीं काम नाहीं. आजपासून तूं एक माझ्या मंत्र्यापैकींच आहेस असं मी समजतों. प्रसंगविशेषीं असेच मोठाले पराक्रम करून माझ्या राज्याची अब्रू रक्षण करीत जा. एवढी माझी सेवा केलीस म्हणजे बस्स आहे.

**बल्लव**—राजा, या कंकभटजींनीं आपल्याजवळ माझी शिफारस केली म्हणूनच हा अपूर्व योगायोग घडून आला. यासाठीं कंकभटजी, तुम्हांला मी कांहीं द्यावें अशी वस्तुच माझ्यापाशीं नाहीं म्हणून मीच आपल्याजवळ आशीर्वादाची देणगी मागतों तेवढी मला कृपा करून द्या म्हणजे झालं. ( कंकाच्या पायां पडतो. )

**कंक**—( सगद्दीत अंतःकरणानें ) बा बल्लवा, तुझ्या गुणाची महती मी किती तरी गाऊं. आंगांत भरपूर शक्ति असून लीनतेनें ओतप्रोत भरलेला असा पराक्रमी वीर तूंच माझ्या आढळण्यांत आलास. तुझी कीर्ति फार दिवसापासून मला माहीत आहे. परमेश्वर तुला पूर्ण आयुष्य देवो, आणखी असेच मोठाले पराक्रम तुझ्या हातून घडोत. जगांत शेराला सव्वाशेर कुठें तरी असतो, ही गोष्ट ध्यानांत धरून तदनुसार आपलें वर्तन ठेव म्हणजे झालें. बाबारे, गर्वाचें घर खालीं कसें असतें हें जिमूत मल्लाच्या वर्तनापासून सर्वांनीं ध्यानांत धरण्यासारखें तत्व आहे. नम्रता ही एक अपूर्व वस्तु आहे. ( इतक्यांत सैरंध्री पुढें व तिच्यामागें धांवत असलेला कीचक सभेमध्यें प्रवेश करतात ).

**सैरंध्री**—( घाबरेपणानें ) राजा, या तुझ्या मदांध सेनापतीनें माझी अगदीं पाठ पुरवून सोडली आहे. जशी आकृतीबरोबर

साधली असावी त्या प्रमाणें हा मदांध मी जाईन तिकडे माझ्या पाठीमागें एखाद्या मत्त महिषासारखा हात धुवून पाठीस लागला आहे. सर्व भूमंडळ याला नीरवीर असें वाटूं लागलें आहे. राजा, या अनाथ अबलेच्या पातिव्रत्याचें रक्षण तुज वांचून दुसरा कोण करणार बेरें ? ( इतर सभासद आश्चर्यचकित होतात. )

**कीचक**--( सैरंध्रीवर रागानें दांत ओंठ चावून ) अगे, जो काळाला भीत नाहीं तो नृपाळाला भिईल काय ? तूं माझ्या डोळ्यांत धूळ फेंकून इकडे पळून आलीस त्याचें भरपूर प्रायश्चित्त आतां तुला मी देतों. माझ्या कृत्याला जो कोणी अडथळा करील तो प्राणास मुकेल; हें मी सर्वत्रांना बजावून सांगतों. ( द्रौपदीचे केंस धरून तिला लत्ताप्रहार करून जमिनीवर पाडतो.) तुला सोडविणारा या ठिकाणीं कोण येतो आहे तो पाहतों.

**विराट**--कीचका, अबलेचा छळ करणें हाच काय तुझा पुरुषार्थ ?

**कीचक**--( रागानें ) चूप! जास्त बोलण्याचें काम नाहीं. कमजास्त गडबड करशील तर तुला देखील ठार करीन. मग बहीण विगलधवा झाली तरी बेहेत्तर. ( कीचक जातो. )

**बल्लव**--( रागानें दांत ओंठ चावून ताडकन उठतो ) राजा, भरसभेंत अशा अनाथ अबलेचा छळ चाललेला पाहून तूं डोळ्यावर कातडें ओढून स्वस्थ बसतोस हीच काय तुझी राजनीति ? ही स्त्री कोणी असो, पण असा नीतीचा खून होत असलेला पाहून माझ्या आंगाचा तिळपापड होत आहे. तुझ्या या मदांध सेनाधिपतीला आपल्या पराक्रमाची मोठीच घमेंड दिसते. आतां या वेळीं कोणाचीही पर्वा न करतां मी एका क्षणांत याला मातीला मिळवून टाकीन तरच खरा बल्लव. बायकांच्या छळाचें निर्मूलन आम्हां पुरुषांच्या हातून न होईल तर मग एकट्या बायकांनींच बांगड्या

काय ह्मणून भरायच्या ? महासाध्वी, अद्याप जगांतील वीरपुरुष मेले नाहींत असें समज.

**कंक**–बल्लवा, या वेळीं हा आपला विषय नव्हे. मस्ताची मस्ती जिरविणारा परमात्मा समर्थ आहे. आपण याविषयीं संतप्त होऊन रागाला अनावर होऊं देऊं नये. नाहींपेक्षां महाअनर्थ होतील.

**बल्लव**–कंकभटजी, छाती फोडून राग बाहेर आल्यावर त्याला लपवावा कुठं ?

**कंक**–बा बल्लवा, जो रागाला आवरील तो सर्व दुनियेला पादाक्रांत करून टाकील. हें माझें भाषण ध्यानांत ठेव.

**सैरंध्री**–देवा, दु:खाचा कडेलोट झाला. आतां धीर निघत नाहीं. त्यापेक्षां जागच्याजागीं ताडकन् माझे प्राण निघून जातील तर किती बरें चांगलें होईल. नको नको आतां अंत बिलकुल पाहूं नको; प्रत्यक्ष दीनाचा छळ, तशांतून अबलेचा छळ होत असलेला पाहून ज्या राजाचें अंत:करण तुटत नाहीं तो राजा कसला आणि त्याचें हें मंत्रीमंडळ कसचें. मी तर हा निवळ मूर्खांचा बाजार समजतें. राजा, हीच कारे तुझी राजनीति—

पद. (चाल–अभिमान रहित गुणवान॰)

जे दुष्ट असति ते इष्ट वाटतें स्पष्ट तुजसि नृपराया ॥
त्वत्कृति बघुनि कीं नवल वाटतें मनि या ॥ ध्रु॰ ॥
भरसभेंत मारिली लात मजसी नृपनाथ परि न
तुज याची ॥ कां कींव न आली दीन अशा अबलेची ॥
भूपती असिसि सन्मती ह्मणुनि ही युवती स्पष्ट
सांगतसे ॥ धीकू जिणें तुझें मज निंद्य अतिशय भासे ॥
भूपास मंत्री जे दास बनविती खास त्यास कवडीचें ॥

**मोल नसे रे सांप्रत जगतीं साचें ॥ हा बोध ऐकुनी क्रोध करिल बहु अंध भूपती तुजला ॥ परि तव भीति न शिवे किंचित मजला ॥ १ ॥**

**विराट**—बाई, मी रागीट असतों तर तुझी अशी दशा कां झाली असती? बायकांच्या वशिल्यानें त्यांचे भावाला आमच्या-सारख्याकडून महत्व मिळालें कीं ते मूर्खशिरोमणी बनतातच. पण आमच्या सारखे बाईलबुद्धे मूर्खाहून मूर्ख ठरतात. काय सांगूं तुला, याच्या मस्तीपुढें मला नाइलाजास्तव मूग गिळून स्वस्थ बसावें लागतें. या गोष्टीला तूर्त इलाज नाहीं, मी डोळे असून अंध, कान असून बधीर, राजा असून या मदोन्मत्तानें आपल्या धाकानें मला ताटाखालचें मांजर करून टाकलें आहे.

**सैरंध्री**—राजा, हें तुझें भाषण ऐकून हंसावें कीं रडावें हें कांहीं-च कळत नाहीं. अरे, असा पोकळ डामडौल जगांत मिरविण्या-पेक्षां एखाद्याचीं धोतरें बडविलेलीं काय वाईट ? ज्या राज्यांत अबलाछळ होऊं लागला तें राज्य राज्यक्रांतीच्या फेऱ्यांत सापडतें ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. एवढा चवदा चौकड्याचा अधीपती रावण पण तो देखील सर्वस्व गमावून अखेर मातीला मिळालाच. अबला ह्मणजे राज्याच्या लक्ष्मी आहेत. लक्ष्मीचा छळ होऊं लाग-ल्यावर ती नाहींशी होऊन तिथें दारिद्र्याचें साम्राज्य सुरूं व्हावया-चेंच. हें तूं व तुझ्यासारख्या इतर राजांनीं सर्वकाळ पूर्णपणें लक्षांत ठेवावें.

पद–( वेषाचें सार्थक किती ).

**दुर्मती मंत्रिजनाधीन भूपती ॥ होतो तो असुनि जिता मृतची दुर्मती ॥ दीनांचा छळ बघुनि हर्ष मानिती ॥ सत्य ते न नर मजला खरचि भासती ॥ नीतिधर्म उल्लं-**

घन होऊनि अती ॥ गेल्यावर सत्तेला लाथ मारिती ॥
मद्-अरीचा सूड घेई त्वरित भूपती ॥ नातरि शापून
करिल भस्म ही सती ॥ ध्रु० ॥

**विराट**—महासती, या तंट्याचें मूळ समजल्याखेरीज मी न्याय तरी कसा करावा. हें मूळ मला समजल्यास तुझें दुःख निर्मूलन करीन. परंतु काय करूं, तूर्त चोहोंकडून माझा नाइलाज झाला आहे. या साठीं साध्वी मला क्षमा कर.

पद.

नयन माझे खुलुनि गेले तुझ्या सद्बोध मंत्रानें ॥
तरी निरुपाय होऊनि करुनि बसलों अधोवदनें ॥
मला अंकित केलें गे तुझ्या बलवान् शत्रूनें ॥
क्षमा साध्वी करीं मजला पदरीं घेऊनि सन्मानें ॥

साध्वी, तुझें भाषण जरी संतापानें भरून गेलें आहे, तरी तूं केलेला उपदेश प्रत्येक राजानें आपल्या ध्यानांत ठेवावा इतकी त्याची योग्यता आहे. शाबास धन्य तुझी.

**कंक**—राजा, तुझें बोलणें अगदीं यथार्थ आहे. परंतु काय करावें; तूं काळसर्पाला बिऱ्हाड दिलेंस हीच तुझ्याकडून मोठी चूक झाली. असो, जें झालें तें होऊन गेलें. सैरंध्री, दीनाचा पालनवाला सर्व शक्तिमान् प्रभु समर्थ आहे. तो तुला सर्व संकटांतून खास मुक्त करील हा माझा पूर्ण आशीर्वाद आहे. कालचक्राच्या फेऱ्यांत जो कोणी सांपडेल त्याच्या नुसत्या आक्रोशानें कधींही फायदा होणार नाहीं. त्यानें ईशचिंतनच केलें पाहिजे. यावांचून या रोगाला दुसरी मात्राच नाहीं. ( सैरंध्री खेरीज सर्व जातात. )

**सैरंध्री**—( स्वगत ) कालाला थरथर कापविणारे माझे गंधर्व

पती असून आज गतधवे प्रमाणें नुसत्या आक्रोशांत समाधान मानून घेण्याचा प्रसंग ह्या हतभागिनीवर यावा ना ? असो, जगदश्विरा तुझी मर्जी.

पद

**गोविंदा त्वत्पदांबुजिं वंदन करिते किंकरी ॥ मातें आधार कोणी नाहींच या भूवरी ॥ मायेचा हा खेळ तुझा आनंद देइ अंतरीं ॥ दुष्टाचा या अंत आतां देवा करी तूं लौकरी ॥ ध्रृ० ॥**

(जाते.)

---

## प्रवेश २ रा.

(एक एकांतस्थळ–धर्मराज, अर्जुन, नकुळ व सहदेव यांचा प्रवेश.)

**धर्मराज**—(दुःखाचा सुस्कारा टाकून) दुर्दैवा, तुझे खेळ मोठे विलक्षण आहेत. तूं प्रतिकूळ झालास कीं मनुष्याच्या दुःखाला पारावार नाहींसा होतो. सोन्याची मृत्तिका होते, हिऱ्याच्या गारा होतात; असे किती प्रकार म्हणून सांगूं. ज्या वेळेस मला द्यूत खेळण्याची बुद्धी झाली त्या वेळेसच माझ्या सदीचा ओघ आटला, नाहींपेक्षां भरराजसभेंत प्रत्यक्ष कुलवनितेला दुष्टानें केंश धरून लत्ताप्रहार केलेला पाहून आम्ही निमूटपणें नपुंसकाप्रमाणें हतवीर्य होऊन बसलों असतों काय ? असो, तुझी मर्जी. या नशिबाचे आणखी काय काय खेळ होणार आहेत न कळे. वत्सा नकुळा, सहदेवा, वृकोदराला बोलवायला गेला होता त्याचें काय झालें ? तो तुम्हांला भेटला का ?

**सहदेव**-दादा, त्याचा निद्राभंग करून श्रीमुखांत कोणी खाव्या? एकदां स्वारीनीं हातपाय ताणले कीं मग त्यांना जागृत करण्याची कोणाची छाती आहे. ज्याचा आहार मोठा त्याला झोंप कमी घेऊन कसें चालेल ? सध्यां भीमसेनदादाची मात्र चंगळ उडत आहे खरी. साखरेचें खाणार त्याला देव देतो न दुसरें काय ? मग गरिबी असो वा श्रीमंती असो.

**अर्जुन**—जसा त्याचा आहार मोठा तसा तो पराक्रमी नाहीं का ? एवढा थोरला जीमूतमल्ल पण आमच्या राजेश्रींनीं एका मुष्टीप्रहारांत त्याचा चकाचूर उडवून दिला. शिवाय राजाकडून बक्षिस मिळविलें हा काय लहान सहान पुरुषार्थ. ज्याचें काम त्यानें केलें कीं तें बेमालुम व्हावयाचेंच.

**नकुल**—आमच्या दुर्दैवानें पराक्रम दाखविण्यास आह्मांला संधी कशी ती मिळतच नाही. पण दादा, आपण आज सचिंत होऊन वारंवार दुःखाचे हुंदके काय ह्मणून देतां ? सांगा काय तें अगोदर, आपल्याला कोणी त्रास दिला असेल किंवा कोणी अपमान केला असल्यास सांगा; त्याचीं पाळेंमुळें खणून टाकतों. आमच्यानें आपली ही दुस्थिती पाहवत नाहीं हो !

**धर्म०**—वत्सा नकुला, माझ्या दुःखाचें मला तिळप्राय देखील वाईट वाटत नाहीं. पण पांचाळीवर गुदरलेल्या कहराची आठवण होतांच या हृदयाचे तुकडे तुकडे होतात. शांती तरी आतां कोठपर्यंत धरावी. अगदीं कडेलोट झाला तरी दुर्दैवापुढें मुकाट्यानें स्तब्ध बसावें लागतें. पुरुषाची गोष्ट निराळी पण बायकांना या दुनियेंत भीतिवांचून एक देखील स्थळ नाहीं. अभागिनी, पांचाळी, तूं खरोखर फुटक्या नशीबाची. आह्मी तुझे पती जीवंत असतां विधवेप्रमाणें दीन होऊन तुझा हव्या त्या अधमानें केलेला छळ

निमुटपणें डोळ्यां देखत पाहण्याचें आमच्या प्राक्तनीं असावेंना ? एकाहून एक असे तुझे पराक्रमी पती भूतलावर जिवंत असून तुला बटीकही न शोभणाऱ्या अशा राणीची तूं दासी व्हावेंसना ? एक घंटा बडविणारा भटजी, दुसरा स्वयंपाकी, तिसरा नटवा नर्तक, चौथा चाबुकस्वार व पांचवा गोपाळ, अशी तुझ्या राजकुलोत्पन्न पतींची अवस्था व्हावीना ? छे, या गोष्टीला कारण मीच कर्मचांडाळ! आतां आह्मी कोणत्या तोंडानें तिची समजूत घालावी ? ती ह्मणेल काय ? अशा नाना प्रकारच्या क्लेशानें जड झालेले प्राण अद्यापि टिकाव धरून कशाला राहिले आहेत न कळे. या सर्व गोष्टींचें कारण ही प्रबळ आशा. आशेनें ज्याला मारलें नाहीं असा भूमंडळीं एखादाच पुरुष सांपडेल. तस्मात् आशे तुझी धन्य आहे. चांगलें वाईट सर्व कांहीं तुला खपतें इतकी तूं अधाशी आहेस. बारा वर्षें वनवास, सांप्रतचा अपमानकारक अज्ञातवास, स्त्री विटंबना इतक्या असह्य गोष्टी सहन करून पुन्हां राजा कधीं होईन ही आशा आहेच. तस्मात् धिक्कार असो या जिवित्वाला. आमच्यासारख्या हतभाग्यांना अजूनपर्यंत जिवंत ठेवण्यांत परमेश्वराचा काय हेतु आहे नकळे. वृकोदर आला असता ह्मणजे बरें झालें असतें. आतां दिरंगाई करून उपयोगी नाहीं. कारण स्त्रीविटंबना पाहण्यापेक्षां एक मरावें किंवा हरप्रयत्न करून शत्रूचा सूड घ्यावा ह्याखेरीज दुसरी गोष्ट नाहीं.

पद.

**चंचल हें विभव असे ॥ एक स्थळीं न राहतसे ॥ नियम मुळीं यास नसे ॥ अप्रमाण हें ॥ ध्रु० ॥ असुनि असे मनुज फसे ॥ यास कसें कळत नसे ॥ अ-**

**प्रमाण हें ॥ ध्रु० ॥ हंसवि रडवि भुलवि सुखवी ॥ नानापरि खेळ दावी ॥ व्यर्थ गर्व करुनि मूढ मनुज उगिच कासया फसे ॥ ध्रु० ॥**

अर्जुना, तुझें काय मत आहे तें सांग.

**अर्जुन**—अजातशत्रो, माझें मत आपले स्वाधीन कधींच केलें आहे. एकी हेंच ब्रह्म. आणखी त्याचें अवलंबन जे करतील तेच परब्रह्म मिळवितील. सर्व हकीगत मला समजली आहे. पण करूं काय? आपले आज्ञेवांचून पाऊल देखील टाकतां येत नाहीं ह्मणून मुक्याप्रमाणें स्तब्ध बसणें भाग आहे. जेथें आपली मान, तेथें आमचा चौघांचा प्राण. आज्ञा मात्र द्या कीं हें ब्रह्मांड श्रीकृष्णकृपेनें उलथें पालथें करतों आपण सचिंत काय ह्मणून होतां? हा देह जर सत्कारणीं झिजला नाहीं तर पशूंत व आमच्यांत अंतर काय आहे? पशू देखील त्याला कोणी त्रास दिल्यावर जिवाची पर्वा सोडून शत्रूचा सूड घेतात. मग आम्हीं तर राजपुत्र आहोंत. उगीच डोळे मिटून कधींही प्राण सोडणार नाहीं. दुष्टाचें निर्दलन करणें हा तर आमचा मुख्य बाणा. बोला काय तें. आपली आज्ञा प्रज्वलीत करा. तिला मनांतल्यामनांत दाबून किती दिवस ठेवणार. ही सहनशीलता कोठपर्यंत धरावी. तिचा आम्हांला तरी वीट आला आहे.

**नकुल**—आर्या, अर्जुनदादा ह्मणतो तें अक्षरशः खरें आहे. हा नेभळेपणा बिलकूल कामाचा नाहीं. लोक उघडपणें आमच्या तोंडावर थुंकणार. सर्वस्व गेलेलें पतकरलें. पण कुलस्त्री व स्वातंत्र्य जे गमावतात त्यांच्यासारखे भ्याड व नेबळे दुसरें कोणीच नाहीं. आह्मां चौघांना आपल्या हातून मरण आलेलें पतकरेल. पण आतां हा अपमान मरणाहून भयंकर आहे. मातेच्या उदराला व्यर्थ शीण

देऊन " खायाला काळ व भुईला भार " असें जिवित्व कंठण्यापेक्षां तें नाहींसें झाल्यानें दुनिया ओस थोडीच पडणार आहे. दादा, प्राणापेक्षां आपली आज्ञा आह्मांला आवडती आहे. ह्मणूनच स्वस्थ बसणें भाग आहे.

**सहदेव**—दादा, आतां होऊंद्याच एकदां कायमचा निश्चय. पुरे झाला आतां विचार. अतिशय विचारानें देखील मनुष्यें वेडीं होतात. आपणा चौघांचे बाहेर भीमदादा थोडाच जाणार आहे, त्याचा आपला धोपट मार्ग. एक मारायचें किंवा मरायचें. या दोन गोष्टी त्याला ठाऊक. भाडभीड वगैरे त्याला स्वप्नांत देखील ठाऊक नसतात. एकपरी तो करतो हें मला मनापासून आवडतें. गंभीर अशा सिंहाप्रमाणें शांत बसलेली आज्ञा मुखावाटे बाहेर निघूंद्या कीं मग दाखवितों सपाटा. बाहूचा कंडू कधीं शमन होईल असें झालें आहे. आईबापाच्या पोटीं जन्म घेतल्याचें सार्थक करूंद्या. दूध उताला आल्याप्रमाणें आमच्या वृत्ति यावेळीं झाल्या आहेत. त्या उपदेशरूपी जलसिंचनानें जागच्या जागीं जिरवूं नका. आतां खरोखर आमच्यानें धीर निघवत नाहीं. वनवासी होऊं, उपाशीं मरूं; पण जिवंतजीव आहे तोंपर्यंत अपमान, स्वस्त्रीविटंबना, व पारतंत्र्य हीं कधीं ही सहन करणार नाहीं. इतके प्रकार सोसून जर स्वस्थ बसावयाचें तर मग आह्मी जिवंत प्रेतेंच नाहीं कां ?

**धर्मराज**—बाबानों धीर धरा. अद्याप दहा दिवसांचा अवधी आहे तोंपर्यंत हे अशौच्याहून निंद्य दिवस मुठींत जीव धरून कसे तरी कंठलेच पाहिजेत. हे दाहा दिवस पार पडल्यावर आपल्या शत्रुला त्राही भगवान करून सोडूं. उच्छृंखळपणा पुरुषांनीं कधींही करूं नये. तो एखादे वेळीं बायकांनीं केला तर चालतो. शिजून

तयार झालें आहे निर्वेपर्यंत धीर धरला पाहिजे. अति दुःखाचा परिणाम सुखांत व्हावयाचा हा अगदीं सिद्धांत आहे. हे सर्व खेळ त्या जगदीश्वराचे आहेत. क्षणांत रंक व रंकाचा राव करणें त्याचे हातीं आहे. आपण कळसूत्री बाहुल्याप्रमाणें आहोंत. माझ्या आज्ञेला कोण विचारितो ? त्याची आज्ञा झाली पाहिजे. स्वस्थ असा, शांती हीच खरी विश्रांति. हिचें अवलंबन जो करील तोच पुरुष. ईश्वरावर हवाला ठेवा. अब्रुबेअब्रू झाली तर त्याची; आपण निमित्तमात्र आहोंत. चला आतां, बहुधा याज्ञसेनी भीमसेनाच्या भेटीला गेली असेल. आपणा चौघांपेक्षां तिला भीमसेनाचाच जास्त भरंवसा आहे. आणखी तो कांहीं गैरशिस्त आहे असेंही नाहीं. वाघाप्रमाणें किरण साधून असा; सावज सपाट्यांत आल्याबरोबर ससाण्याप्रमाणें झडप घालून सिंहाप्रमाणें त्याची आहुती करा. एकमत असूं द्या, तरच तुमची पत राहील. नाहींपेक्षां नापत झाल्यावर तुम्हांला चिमुटभर माती देखील मिळणार नाहीं. चला आतां. श्रीकृष्ण परमात्मा अखेर अमंगलाचें मंगल करीलच करील—

सर्वजण—पद ( राग बेहाग, ताल–त्रिवट. )

तव माया कुणा देईन अंत ॥ श्रुति न जाणे ॥ तुज प्रभुवर चरणकमलिं ठाव दे ॥ शांतवन करोनि झडकरि सर्वस्वी तूंच आधार पांडवांसी यदुवीर ॥ ॥ ध्रु० ॥ जगन्नाथा पूर्णानंद दे झडकरि शांती सुख अनुभव घेऊं दे महिवरी ॥ भवांबुधितूनी तारी गदाधरा ॥ गुणाकरा ॥ रमावरा ॥ अभयवर ॥ ध्रु० ॥

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा. ( स्थल पाकशाला. )

( निद्रिस्त असलेल्या भीमसेनास द्रौपदी जागें करित आहे असा प्रवेश होतो. )

**द्रौपदी**–( मोठ्या विनयानें झोंपेंतून उठवून ) पतिराज उठा, घोरत काम पडलां आहांत ? अहो, प्रत्यक्ष माझ्या सौभाग्यमंदिराला अग्नि लावण्याला शत्रू प्रवृत्त झाला असतां अद्यापि कालस्वरूपाहून भयंकर अशा निद्रेंत कसे हो दंग झालांत ! कांहीं तरी कुलांगनाची शरम असूं द्या. पवित्र अशा पातिव्रत्यरूपी भांडारावर दरोडेखोर तुटून पडलेले माहीत असतां आपल्याला क्षिती वाटत नाहीं, तेव्हां आपल्याला शांतीची देणगी दिली ही त्याच्याकडून मोठीच चूक झाली म्हणावयाची.

### पद.

**अभिमान शून्य कां झालां ॥ शौर्याग्नि विझुन कां गेला ॥ धृतिसागर शोषुनि नेला ॥ शत्रुनें कसा या काला ॥ कुलकीर्ति लोपुनी गेली ॥ अब्रूची मृत्तिका झाली ॥ धव असुनी विधवा केली ॥ अंगना शत्रुनें आपुली ॥ काल हा प्रतिकुल झाला ॥ दुर्दैवें या समयाला ॥ ध्रु० ॥**

**भीमसेन**–( जवळ घेऊन तिला कुरवाळून ) लाडके, आतां लौकरच शांती या निद्रेचा त्याग करून शत्रूची कालरूपी निद्रेच्या मुखांत आहुती करण्यास प्रवृत्त होईल. सखे, हा उच्छृंखल होण्याचा समय नव्हे. नुसत्या रागानें शिरा ताणून त्याचा आविर्भाव दाखविण्यांत भूषण का आहे. रागाला एकवार मोकळा सोडल्यावर मग त्याला पाहून काळाची देखील गाळण उडाली पाहिजे. नाहीं पेक्षां वळीवाच्या पावसाप्रमाणें क्षणैक राग काय कामाचा ? धीर धर,

त्याची अनावर होण्याची वेळ अगदीं सन्निध आली आहे. लाडके, आह्मी पांडव भूतलावर जिवंत आहोंत तेथपर्यंत तुझ्या पातिव्रत्याची भीति तूं काय ह्मणून बाळगतेस. धीर धर. मला सर्व कांहीं कळत आहे. पण मला धर्माज्ञेवांचून कांहीं एक करतां येत नाहीं. तो सर्व कांहीं जाणत आहे. तो आपल्या आज्ञेची किंमत पूर्णपणें जाणून आहे ज्या वेळेस तो बंदींत पडलेली आज्ञा मोकळी सोडील त्या वेळीं ही तप्त झालेली भूमी रक्तानें न्हाईल. तिजवर अस्थींचे पर्वतप्राय ढीग पडतील. मांसाचा कर्दम माजेल. ती तुला अद्याप शांत दिसत आहे. याचें कारण फार वेगळें आहे. ज्यावेळीं ती उग्र स्वरूप धारण करील त्यावेळीं ह्या ब्रह्मांडगोल हादरून जाईल. प्रत्यक्ष इंद्राच्या उरांत धडकी भरेल, हिच्या दणदणाटानें दशदिशा थरारून जातील, इतकी ती भयंकरस्वरूपी आहे. ह्मणूनच–

श्लोक.

भावी अनर्थ टळण्यास्तव याज्ञसेनी ॥ हें सर्व दुःख बसलों बघ मी गिळोनी ॥ ब्रह्मांड हें उलथण्या नच वेळ कांते ॥ कां वाक्प्रहार करिसी रमणी अह्मातें ॥

**द्रौपदी**—अहो, त्या कृतांतस्वरूपी कीचकानें माझे केश धरून भरसभेंत लत्ता प्रहार केला असूनही आपले वडील बंधू शांततेचा उपदेश करतात तेव्हां या गोष्टीला हंसावें किंवा रडावें. मीच अभागी, तुमच्याकडे त्याचा काडीभर देखील दोष नाहीं. कारण–

पद.

असुनि पांच संकट समयीं न एक कामी ॥ स्वामी ॥
कांतेची लाज ज्या न कांत तो निकामी ॥ स्वामी ॥
राग नसे ज्या नरास ॥ पुरुष त्या न वदति खास ॥
भर सभेंत पती समोर ॥ स्त्रीविटंबना अघोर ॥

**करि अरि विनघोर कशि न शरम अंतरामी ॥ देव-ब्राह्मणा समक्ष खचित फसुनि गेलें का मी ॥ ध्रु० ॥**

प्राणनाथ, धडधडीत लुटारू घर लुटण्याला आले असतां डोळे मिटून त्याला खुशाल लुटीची परवानगी द्यायची हा शहाणपणा काय ? ज्यांचें दुःख त्याला माहीत. माझ्या अंतर्यामीच्या वेदनांच्या आपल्याला कल्पना कोठून होणार. ह्मणे धर्माची आज्ञा पाहिजे. प्राण निघून गेल्यानंतर मग अमृतसंजिवनी मात्रा देऊन उपयोग कोणता ? असला कसला बाई भोळेपणा हा ! भोळ्या शंकरापुढचे निव्वळ बनणें हें चांगलें का ? पुरुषाच्या आंगीं जर राग वास्तव्य करीत नाहीं, तर मग भर रस्त्यावर बायकांची अब्रू केर काढीत राहील. आपण कांहीं ह्मणा, पण धर्माची वृत्ति अधर्मी झाली म्हणूनच हे आम्हांला दिवस आले. हा सर्व द्यूताचा परिणाम बरं. द्यूताच्या नादांत सर्वस्व गमावून वर पणाला जो आपली प्रत्यक्ष कुलवनिता लावायला तयार झाला त्याची प्रशंसा आपण पाहिजे तर करा. स्वतां घंटाबडवे होऊन आपणाला आचारी, पार्थाला नटवा नट, नकुलाला चाबुकस्वार, सहदेवाला गोपाळ आणि मला दासी व्हावें लागलें हें कोणामुळें ? धर्म असता तर असा अधर्म पृथ्वीवर थयथयाट घालता काय ? काय सांगूं एकेक गोष्टीची आठवण झाली ह्मणजे असें वाटतें कीं, मी राजांगना न होतां तशीच कुमारी राहिलें असतें तर आतांच्याहून माझं पुष्कळ कर्मा हंसें झालें असतें. तुम्ही करा पाहिजे तर त्यांची हवी तितकी स्तुती. मला त्यांची मुळींसुद्धां ऐकायला नको.

**भीम०**—पांचाळी, तुझ्यासारख्या विचारी व सूज्ञ स्त्रियेनें प्रत्यक्ष धर्माची निंदा करावी व मी ती स्वस्थपणें ऐकून घ्यावी काय ? यावेळीं निंदा करणारी प्रत्यक्ष स्त्री आहेस म्हणून बरं; नाहींपेक्षां दुसऱ्या

कोणीही अशी निंदा केली असती तर त्याचा तत्काळ प्राण घेतला असता. द्रौपदी, जराशी भानावर ये. श्रीकृष्णलीलेनें या जगाच्या रंगभूमीवरील नाटकाच्या नटीचें आधिपत्य तुझ्याकडे आलें आहे. तेव्हां होतील ते हाल तुला सोसल्यावांचून गत्यंतर नाहीं. खुळे, याचा धर्माकडे काय दोष. तो काय आणि मी काय सर्व बाहुलीं आहोंत. नाचवील तसें नाचावयाचें एवढेंच काय तें आपल्या हातीं. विचार कर व मी सांगतों हें नीट लक्षांत ठेव.

पद.

**खेद न मानि जनिं अभिमानी ॥ संकट हरिल हरिवर-दानी ॥ पांडव जगतिं असति जिवंत ॥ अरिभय नाहिं गे गुणखानी ॥ ध्रु० ॥**

द्रौपदी, जरा रागाला आवरून धरशील तर किती बरें चांगलें होईल. आम्ही मेल्या आईचें का दूध प्राशन केलें आहे. पण हा समय नव्हे. म्हणूनच स्वस्थ बसणें भाग आहे. द्रौपदी, तुला श्रीकृष्णाची शपथ घेऊन सांगतों तें हेंच कीं या भूमंडळांतील दोनच स्त्रीलिंगी वस्तू मला प्राणापेक्षां प्रिय आहेत. ऐक—

पद.

**गदा घाव शत्रूस देई ठाव ॥ रणीं त्याजला दाखवील प्रभाव ॥ महा रुद्ररूपी असे यत्प्रभाव ॥ म्हणोनी न लागे कुणाचा निभाव ॥ जशी लौकिकीं शोभसी तूं अंतरामीं ॥ तशी ही रणीं साह्य दे भीम कामीं ॥ जशी भोगसी दुष्ट अज्ञातवास ॥ तशी ती करीगे स्मशानांत वास ॥ तुम्ही दोघिही सारख्या भीमसे-ना ॥ हरीच्या कृपें दूर होतील दैना ॥ ध्रु० ॥**

ज्यांनीं ज्यांनीं तुला अनिवार दुःख दिलें आहे त्यांचा समाचार

ह्या भीमसेनच घेणार हें पक्कें समजून ऐस. वेळ मात्र येऊं दे कीं मग—

**श्लोक.**

**शत्रूंची नरडीं रणीं रगडुणी रंडा तयाच्या स्त्रिया ॥**
**लोकीं या करितों पहा रमणि मी शांती तुझी व्हावया ॥ ज-**
**कांते या पुढती सुदीन तुजला येतील गे लौकरी ॥ ली**
**श्रीराधारमणा अहर्निश सती गे सांठवी अंतरीं ॥ ६**

जा, तुझ्या शत्रूला आज रात्रीं नाटकशाळेंत यायला सांग. तेथें मी सिंहासारखा किरण साधून त्याची बाट पहात बसतों. आणखी मग या भीमसेनाचा भीषण क्रोध कसा आहे तो प्रत्यक्ष पहा. अगदीं देखील भिऊं नकोस. दुनियेंतील कांहीं कार्यें युक्तीनें साधावीं लागतात, व कांहीं शक्तीनें साध्य करून घ्यावीं लागतात. या समयीं अगोदर मुख्य मान युक्तीकडे आहे, नंतर शक्ती कडे जाणारा आहे. तुझी समजूत कशी तरी होईल, पण या निराकार सवती मोठ्या मत्सरी आहेत. अगे, येथून नुकताच शत्रुवधाला आरंभ होणारा आहे. पुढें माझे हातून इतके कांहीं संहार घडणार आहेत कीं ते पाहून तुझ्या उरांत धडकी भरेल. माझी भयंकर कृतांतस्वरूपी मूर्ति पाहून तुझे नेत्र दिपून जातील. मग माझा संताप कोणाच्यानेंही आवरणारा नाहीं. मग तो धर्म-अधर्म कांहींएक समजणार नाहीं, प्रळय कालालाही तो हटवील. मग आतां पुरे झाला ह्या मेला राग असें म्हणून तूंच माझें आर्जव करशील. मग या भीमापुढें भीड मुर्वत वशिला कोणाचाही चालणार नाहीं. घाल गदा आणि कर कपाळ मोक्ष हेंच माझें व्रत.

**॥ पद ॥**

**माना साठीं देईन मी प्राणाला ॥ श्रीहरी हरिल असु-**
**खाला ॥ ध्रु० ॥ जनीं वीरकांता ॥ असोनि ही चिंता ॥**

**करि वृथा न तूं सुकुमारी ॥ शत्रुस रगडुनी मुष्टि प्रहारें ॥ बलि त्याचा देईन मी काला ॥ ही प्रतिज्ञा सत्य करुनी ॥ देइन शांती जिवाला ॥ ध्रु० ॥**

सुखेनैव जा. आणखी बरोबर एका प्रहराच्या आंत कीचकाच्या पी देहाचा मांस पिंड तुला दाखवून तुझा अनिवार कोप थंडगार रून टाकीन.

**द्रौपदी**—प्राणनाथ, माझी सर्व भिस्त खरी ह्मणाल तर आपणावरच आहे बरें. मी तरी आपल्या शिवाय दुसऱ्या कुणाला जाऊन गाऱ्हाणें सांगूं. या सुंदर स्वरूपाला मला एकवार कडकडून भेटूं द्या. येथून आपल्या भयंकर स्वरूपांत हें सुख मला कधीं मिळेल तें मिळो. ( भीमाला कडकडून आलिंगन देते. )

**भीम**—( आनंदानें ) अहाहा ! स्वर्गसुख देखील यापुढें तुच्छ आहे असें मी समजतों. असले सुखोपभोग स्वर्गांत थोडेंच मिळणार. ( चुंबन घेतो. )

**द्रौपदी**—देवि कुलस्वामिनी, माझ्या प्रियाला सुखी ठेव ह्मणजे मी तुझी मोठ्या प्रेमानें ओटी भरून विजयश्रीसह प्राणनाथाला पंचारतीनें ओंवाळीन.

**पद.**

**अरिवध करा ॥ धराभार सारा ॥ हरा उदारा गुणाकरा ॥ निज अरि शिरा चरचरा चिरा ॥ नच विलंब आतां मुळीं करा ॥ हरि करि सहाय ॥ जयास जगांत ॥ तयास कांहींच उणें नसे ॥ गांजलें मी फार कांता अरि छळ वन्हित पोळुनी ॥ मदांध शत्रुस आणोनि जेरीस रणीं जयश्रीस झणीं वरा ॥ ध्रु० ॥**

( उभयतां जातात तोंच पडदा पडतो. )

---

## प्रवेश-विष्कंभक.

( स्थळ कीचकाच्या महालाची चौकी. )

**द्वारपाल**–काय करावें ! माझा धनी कामांध झाल्यामुळें अगदींच नीतिभ्रष्ट झाला. सर्व जग त्याला तुच्छ भासूं लागलें आहे. भर राजसभेंत एका गरीब पण पवित्र अशा वनितेला दुष्ट वासना पूर्ण केली नाहीं म्हणून रागानें लत्ताप्रहार त्यानें करावा ? पण राजाचा उपमर्द करून मूर्खपणाचें प्रदर्शन लोकांपुढें मांडावें या गोष्टी महा अनर्थाला कारण झाल्यावांचून राहणार नाहींत. एखाद्या क्षुल्लक मनुष्याचें दुष्ट कृत्य जगासमोर केव्हांच येतें. परंतु मोठ्या लोकांनीं केलेलीं दुष्टकृत्यें अंधारांत कांहीं दिवस लपूं शकतात. परंतु कांहीं कालानें तीं पाप्याच्या चोरून तरी बाहेर पडतातच. राजाचे अधिकारी मदांध व बेपरवाई झाल्यावर प्रथम प्रथम दिनांचा अतिशय छळ होतो खरा. परंतु पुढें आ पसरून बसलेल्या राज्यक्रांतीनें आपलें विक्राळ स्वरूप प्रगट केलें म्हणजे रंक रावाचे छातीवर बसून आपला सूड उगवून घेतल्यावांचून राहत नाहींत. आमचा राजा भोळा सांभ पड़ला म्हणूनच सेनापती व त्यांची बहीण हे तूर्त राज्यामध्यें करतील तें प्रमाण असें होऊन गेलें आहे. राजानें काय किंवा दुसऱ्या कोणी हीं काय बायकांवर फाजील विश्वास ठेविला कीं उलट त्या डोक्यावर मिरीं वाटायाला लावायच्याच. ह्या बायका म्हणजे सूत सांपडलें कीं स्वर्गाला जायच्याच. जोंपर्यंत धाक जास्ती व प्रेम कमी तोंपर्यंत ह्या रेशमासारख्या नरम असतात. आणखी जर कां याच्या उलट स्थिति झाली कीं आटपला बाजार. मग पुरुषांची अब्रु रस्ता झाडायला लागलीच समजा. असो. ज्याचें कर्म तो भोगील, आपल्याला या गोष्टीची काय म्हणून पंचाईत. धन्याची इमानें इतबारें नोकरी करावी व खुशाल हरीच्या नांवावर पोटभर भाकरी

खावी. आज नाट्यशाळेंत स्वारी मघाशीं मोठ्याच लगबगीनें गेली. आज कांहीं कमीजास्त धांदल दिसते खरी. त्यांचें व सुधेष्णा राणी-साहेबांचें कांहीं खलबत चाललें होतें खरें. बहुधा सैरंध्री दासीबद्दल कांहीं खटपट असावीशी वाटते खरी. काय करणार बिचारी. तिचा येथें कोणीच कैवार घेणारा नसल्यामुळें या राक्षसाची इच्छा पूर्ण केल्यावांचून तिला गत्यंतर नाहीं. एवढा मोठा राजा तो देखील ज्याचे पुढें कान पडलेल्या कुत्र्याप्रमाणें दीन झाला त्यापुढें या बिचारीचा पाड तो काय? असो चला आतां. दोन प्रहर रात्रीचा सुमार झाला. पहारा बदलण्याची वेळ झालीच म्हणायची.

( जातो. प्रवेश समाप्त. )

---

## प्रवेश ४ था.

( स्थळ नाट्यशाला. )

( सैरंध्री वेषानें भीमसेन प्रवेश करतो. )

**भीमसेन**—काय करावें, कुलवनितेच्या पातिव्रत्य रक्षणासाठीं स्त्रीवेष माझ्या नशिबीं धारण करण्याचें आलें. असो. वारा येईल तशी पाठ देणें हेंच यावेळीं योग्य. मदांध व उन्मत्त झालेल्या नर-पशूच्या डोळ्यांत युक्तीप्रयुक्तीनेंच धूळ फेंकली पाहिजे. चला आतां मंचकावर स्वस्थपणें पडून त्या दुष्ट कीचकाचा कोणत्या युक्तीनें प्राण घ्यावा याचा विचार करूं या.

( असें म्हणून मंचकावर निद्रिस्त होतो. )

**कीचक**—( मोठ्या आनंदानें प्रवेश करून ) असा धाकदप-टशा दाखवून चौदाव्या रत्नाचा प्रभाव दाखविला तेव्हां कोठें सैरंध्री रेशमाप्रमाणें नरम आली. कारण काय अगदीं नाईलाज

झाला म्हणूनच तिनें माझ्या अंगिकाराबद्दल बहिणीपाशीं आपला हेतु प्रदर्शित केला. मला वाटतें माझ्या भीतीपेक्षां ती माझा अधिकार, वैभव व सौंदर्य इत्यादि गुणांवरच जास्त मोहित झाली असावी. आज माझ्यासारखी सत्ता आहे कोणाला? करीन ती पूर्वदिशा माझी. माझ्या आड येणार कोण? नशिब खुललें कीं हूँ हूँ म्हणतां हवी ती गोष्ट साध्य होते. ( सैरंध्री मंचकावर निद्रिस्त आहे असें पाहून ) वाहवा! अरे ही तर मी येण्याचे अगोदर मंचकावर स्वस्थपणें निद्रासुख अनुभवित आहे. दुखणें कमी झालें म्हणजे जशी आजारी माणसाला आनंदानें झोंप येते त्याप्रमाणें मला अनुसरण्याविषयीं हिच्या मनाचा पक्का निश्चय झाल्यामुळें निरनिराळ्या कल्पनांनीं हिचें गोंधळलेलें मन शांत होऊन ही स्वस्थ पडली आहे. माझ्या आनंदाला पारावार नाहींसा झाला आहे. इंद्राचें वैभव देखील माझ्यापुढें तुच्छ. प्रत्यक्ष काल देखील मला पाहून थरथर कांपतो. तेव्हां मी प्रति ईश्वर म्हणायला कोणती हरकत आहे? अहाहा! या सुंदरीच्या श्वासोच्छ्वासाच्या सुगंधानें मंदिरांत जिकडे तिकडे घमघमाट सुटला आहे. मधून मधून शुक्राच्या चांदणीप्रमाणें चमकणारे हिच्या कोमलांगावरील नवरत्नांचे अलंकार नेत्राला किती आनंद देत आहेत म्हणून सांगूं? हे कीचका, आतां नुसतें वर्णन करण्यतांच का तूं ही मधुयामिनी घालविणार. आटप लौकर. कामाग्नीनें पोळत असलेल्या देहाची रतिविलासगंगेंत शांति करून घे अगोदर. ( अगदीं निकट मंचकावर बसून ) प्रिये, ऊठ, या निद्रेनें इतक्यांतच का तुझ्यावर पगडा बसविला. हिच्या कोमल हातांना कामें करून करून किती तरी घट्टे पडले आहेत. सुदेष्णे, तुझ्यासारखी कठोर मनाची बायको या भूतलावर दुसरी कोणीही नसेल. अशा सुकुमार सुंदरीला फुलासारखें जतन करण्याचें सोडून

हिच्याकडून कष्टाचीं कामें करून घेण्याला तुला कशी शंका वाटली नाहीं. अरेरे, घामानें हिचा केशकलाप अगदीं भिजून चिंब झाला आहे. काय करणार बिचारी. दासी झाल्यानंतर कामें केल्याशिवाय कसें चालणार ? प्रिये, आजपासून तुझीं सर्व दुःखें नाहींशीं झालीं. महाभाग्यवान् या कीचकाची तूं पट्टराणी झालीस. यापुढें सुदेष्णा देखील तुझी दासी होणार. केवढें तुझें बलवत्तर. प्रिये, मी तुझा रागाच्या भरांत मोठा अपमान केला याबद्दल मला क्षमा कर अँ. खरोखर तूं कोमल मनाची आहेस म्हणूनच सर्व अपराध पोटांत घालून माझा सत्प्रेमानें अंगिकार केलास हे तुझे उपकार मी कोणत्या जन्मीं तरी फेडूं ? वाहवा ! हे आनंदवार्धिनी निशे, तूं आपला मार्ग लौकर लौकर आक्रमणे करूं नकोस अँ. शशांका, तूं ढगाच्या आड राहून मधून मधून आपल्या शीतल किरणानें गवाक्षांतून मंदवायूच्या लहरीबरोबर मला आनंद दे. माझ्यापेक्षां माझ्या सुंदर प्रियकरणीला जास्त सुख झालें पाहिजे. प्रिये, पहाशील तर खरें. हा तुझा आज्ञांकित दास तुझ्या सन्निध आहे. यासाठीं नेत्रकटाक्षांनीं एकवार मला अवलोकन कर तर खरी. मला कोणी पाहिलें नाहीं म्हणूनच बरें नाहींपेक्षां दृष्ट लागून किती अंगारे धुपारे करावे लागते याचा पत्ता लागताना. खरोखर दीपप्रकाश बिलकूल नको असें सेवकाला मी उगीच सांगितलें. या वेळीं दीपप्रकाश असता तर किती बरें बहार झाली असती. चूक झाली खरी, आतां ती थोडीच सुधरणार आहे. बरें नाहींतर नाहीं दिवा. ह्या प्रत्यक्ष सखीच्या मुखचंद्रमापुढें दिव्याची ती काय महती. किती तरी गाढ झोंप हिला लागली आहे. आतां हिला जागी केलीच पाहिजे. असें काय बरें करावें प्रिये. ऊठ आणखी या तुझ्या दासाला आलिंगन दे किंग. आतां अंत तरी किती पहाणार, हें लज्जापटल फेंकून दे. ( आंगावरील

वस्त्र एकीकडे काढून तोंडावर हात फिरवूं लागतो ) सैरंध्री, अग सैरंध्री. ( असें म्हणून आलिंगन देणार तोंच भीमसेन ताडकन उठून ).

**भीमसेन**-( कीचकाला लत्ताप्रहार करून जमिनीवर पाडतो व त्याचे छातीवर गुडघा ठेवून ) सैरंध्री नव्हे हा तुझा कर्दनकाळ सैरंध्रा आहे. नीचा, अधमा, दीन झालेल्या पवित्र युवतीचें पातिव्रत्य भांडार तूं लुटून फस्त करणार होतास नाहींका ? घे तर मग त्याचा मोबदला. ( नरडें दाबतो ).

**कीचक**-( आश्चर्यानें आर्त स्वरानें ) अरे नीचा बल्लवा, असा कपटानें माझा दगा करूं पहातोस यांत पुरुषार्थ तो काय ? मला जरासा मोकळा सोड म्हणजे दाखवितों या कीचकाचें सामर्थ्य कसें आहे तें.

**भीमसेन**-दुष्टा, पुरुषार्थापेक्षां मला या वेळीं स्वार्थाचीच जरूरी आहे. आतां तूं मोकळा कोठून सुटणार. तुझ्या हाडामांसांचा गोळा करून तो गिधाडांना भक्षण करण्याकरितां देतों बरें. धीर धर बाळा, ( कीचक उठण्याविषयीं तडफड करतो. भीमसेन त्याचें नरडें दाबून त्याचा प्राण घेतो. ) झालास एकदां मानवजन्मापासून मोकळा, सुटलास एकदांचा या मृत्युलोकाला. आतां खुशाल कोल्ह्या कुत्र्याचा जन्म घेऊन तुझ्यासारख्या अधमाचीं हाडें चघळीत बैस.

**द्रौपदी**-( घाईनें पंचारती घेऊन येते ) कुलवनितेची लज्जा व पातिव्रत्य रक्षण करणाऱ्या नरवीराला पंचप्राणाची आरती करून ओंवाळली तरी त्याची उपकृती फिटणार नाहीं. अहाहा ! ज्या स्त्रियांना असला पती लाभेल त्या स्त्रियांचें भाग्य कोठवर वर्णन करावें.

**पद**-( माझ्या प्राणपती जिवलगा )

**॥ धरणिं शांति धरा मनिं जरा तुम्हीं प्रियकांता ॥ वाटत भय चित्ता ॥ प्रियाहो ॥ विनति ऐकावी माझि या स-**

**मयाला ॥ सत्वरि रमणिय नाथा ॥ धृ० ॥ हा जीव फार घाबरे बघुनि स्वरुपाला ॥ मती मंद झाली ॥ प्रियाहो ॥ विनती० ॥ धृ० ॥**

( भीमसेनाच्या मस्तकीं तिलक लावून आरती ओंवाळते ).

**भीमसेन**—प्रिये याज्ञसेनी, ही पहिली ओवाळणी तुला अर्पण केली आहे. याच्या पुढें अशाच कितीतरी ओवाळण्या तुला मिळतील याचा अंत देखील लागणार नाहीं. असो. तूं जा आतां. खुशाल निद्रा घे. तुझ्या मार्गांतील कांटा आजिबात उपटून टाकला. आतां गुप्तपणें याची मला विल्हेवाट केली पाहिजे. भगवान गोपाळकृष्णा, ही सर्व तुझीच कृपा. ( जातात ).

**अंक ३ रा समाप्त.**

---

## अंक ४ था.

( सुदेष्णेचा महाल. )

**सुदेष्णा**—( अनुतापानें दुःखित होऊन ) शिव ! शिव ! देवा, तुझी लीला अगाध तर खरीच, पण सर्व दुनियेंत मानवाचा उत्तम जन्म असून या जन्मांत सत्कृत्यें न करितां दुष्ट बुद्धीनें तूं दिलेल्या उत्तम देणगीचा दुरुपयोग करणारी माझ्यासारखी दुसरी कोणीं नाहीं तेव्हां तुला दोष काय म्हणून द्यावा. जसें कर्म तसें फल हा न्याय अगदीं बरोबर आहे. तुझा न्यायाचा तराजु अगदीं समतोल आहे त्यांत काडीइतकीही चूक नाहीं. मी नाहीं का मत्सराच्या पायीं आपल्या एकशेंपांच बंधूला मुकलें. मातापित्याचा वंशक्षय करणारी कर्मचांडाळीण माझ्या सारखी दुसरी कोणी तरी असेल कां ? अधिकार मदानें मी काय म्हणून अबलेचा छल करावा ! गरीब असो

वा श्रीमान असो, लज्जा व अब्रू ज्याला त्याला प्राणाहून प्रिय आहे. सैरंध्री, तूं माझ्या प्रियपतीला अंकीत ठेवशील हा माझा खोटा समज ठार चुकून हा महाअनर्थ अन्य तऱ्हेनें माझ्या नाशाला कारण झाला तेव्हां आतां मी किती जरी आक्रोश केला तरी व जीव दिला तरी माझ्या कपाळीं लागलेला पातकाचा डाग जन्मजन्मांतरीं बुजणार नाहीं. ईश्वर कसल्याही नीच योनींत मला जन्म देवो तिथें देखील माझ्या कपाळीं दुःखभोग हा ठेवलेलाच आहे. प्रथमच जर माझे डोळे उघडते तर असा प्रसंग कशाला आला असता? स्त्री छलाचें अनन्वित पातक समंधाप्रमाणें आ पसरून मी जाईन तिथं माझ्यापुढं उभं आहे. विषासारखं तें माझ्या सर्वांगाची लाही लाही करीत आहे. भूकंपाप्रमाणें रात्रंदिवस मनाला धक्के देत आहे. आतां करूं तरी काय ? या अधर्मामुळें पुढें कोणकोणत्या मला यमयातना भोगाव्या लागणार न कळे. याला आतां खरा उपाय ह्मणजे अनन्यभावें सैरंध्रीला शरण जाऊन कृतापराधाबद्दल क्षमा मागावी. माझा मानपान मी आपल्या हातानेंच नाहींसा केल्यावर आतां वैभवाचा गर्व मनांत आणून उपयोग कोणता ?

॥ पद ॥

**॥ सतीछल केला म्हणुनीयां ॥ दुःखभोग आला नशिबीं या ॥ उपयोग नाहीं रडुनीयां ॥ कर्म तैसें फल मिळतें लोकीं ॥ न्याय तुझा सत्य प्रभुराया ॥ बंधुविरहित जगीं आतां ॥ अंतरामीं गांजितसे चिंता ॥ दुर्दैवानें दिधला कसा गोता ॥ आतां रडुनी उपयोग नाहीं कीं ॥ मजवरि रुसली प्रभुमाया ॥ धृ० ॥**

सैरंध्री, तुझ्या दर्शनरूपी गंगेनें या चांडाळणीचें दुरित क्षालन करून अनाथ किंकरीला सर्वतोपरी क्षमा केलीस तरच माझ्या जी-

वितार्चे सार्थक होईल. नाहींतर अनंतकोटी वर्षे मला दुःसह यातना भोगाव्या लागणार हें तर खास ठरलेलेंच आहे. (जाते.)

---

## प्रवेश २ रा.

विराट, उत्तरा व बृहन्नडा.

विराट नगरींतील उत्तरेचा महाल.

(नाच चालू आहे असा प्रवेश.)

### पद.

**उत्तरा—सुकुमारी सुगृहिणी झाल्यावरती लोकीं या ॥ ॥ धृ० ॥ प्रथम मुलींना गृहशिक्षण जनीं ॥ अवश्य दिधल्यावर या जननी ॥ शाहण्या होती सहजी भूवरि या ॥ सूज्ञ जननीविण पुत्र न होती ॥ पराक्रमी ते वसुमती वरती ॥ बीजापरि ये अंकुर भूमित या ॥ धृ० ॥**

**विराट**—(आपल्याशीं) कीचकवधापासून माझ्या मनाला अतिशय उदासीनता आली आहे. त्या दुष्टांना कृतकर्माचें प्रायश्चित्त मिळालें हें खरं, तरी पण राणी सुदेष्णेसाठीं मला वरपंगी तरी दुःखाचे सुस्कारे टाकावे लागतात. कीचक महाबलाढ्य सेनापती होता खरा पण नाकापेक्षां मोती जड असल्यामुळें माझें वजन अगदीं कमी झालें होतें. असो. "गतं न शोचामि" बृहन्नडे, माझ्या उदास झालेल्या मनाचें समाधान तूं करावंस एवढ्यासाठीं ना मी येथें आलों आहें.

**बृहन्नडा**—राजाधिराज, आपलं मनरंजन करावं हें माझं कर्तव्य आहे.

॥ पद ॥

॥ यदुवीर भजन रत मना करुनि झणीं अक्षय शांतिस देतें ॥ करि भवांबुधीतूनी पार ॥ प्रभुलीला असे कीं अपार ॥ दोहा ॥ श्रीपदिं नत झणीं होऊनी शरण तया जावें ॥ अहर्निशीं भजन सुखें भक्तिपुरःसर गावें ॥ प्रिय भक्ती असें यास फार ॥ करि दुःखें सकल परिहार ॥ झडकरि दुरित भय विनाश करुनि च सुकीर्ती वैभव देते ॥ धृ० ॥

( द्वारपाल प्रवेश करतो ).

**द्वारपाल**-( हात जोडून ) राजाधिराज, दक्षिण गोग्रहण करण्याकरितां राजा दुर्योधन गजपुराहून प्रचंड सैन्यानिशीं निघाला असून या वेळीं आपण जर प्रतिकार न केला तर आपलीं सर्व गाईचीं खिल्लारें तो दुरात्मा हरण करील या साठीं लौकर काय तजवीज़ करणें असेल ती करावी.

**विराट**—द्वारपाला, सेनापतिला सेनेची सिद्धता करायला सांग. आणि कंकभटजी, बल्लव, ग्रंथिक व तंतिपाळ यांना निघण्याची तयारी करांयला सांग. काय करावें प्रसंग मोठा बिकट आहे. श्रीहरी काय करील तें खरं. बृहन्नडे, कार्यगौरवामुळें मला इथून जाणं भाग आहे, याबद्दल मला फार दिलगिरी वाटते. ( जातात ).

---

## प्रवेश ३ रा.

( स्थल महाल विराटनगरी )

( उत्तर प्रवेश करतो. )

**उत्तर**—काय करावें, यावेळीं एकीकडे आड व एकीकडे विहीर अशी माझी स्थिति झाली आहे. इकडे उत्तरेकडील गोग्रहणासाठीं

कर्ण, द्रोण, भीष्म इत्यादि रथी महारथी खवळलेल्या महासागरासारखी अफाट सेना घेऊन निघाल्याचें वर्तमान आतांच जासूदाकडून मला समजलें. दक्षिणेकडे बाबा गेले आहेत, तिकडे त्यांची फत्ते होणारच. आणखी तिकडे त्या कौरवांची फजिती झाली म्हणजे कदाचित् तो दुष्ट दुरात्मा दुर्योधन एकदम उत्तरेकडे आपला मोर्चा फिरवून कर्णाला येऊन मिळेल. मग असें झाल्यावर भयंकर प्रसंग ओढवणार हें खास. दोन्हीं सेनासमूह एकत्र झाल्यावर आमच्या उत्तर गौशाला त्यांच्या हातीं पडून शिवाय ते राजधानींतही प्रवेश करून आम्हांला कायमचें मांडलिक करतील. गौशाला तर आमचें जीवन. त्या नाहींशा झाल्यावर मग आमचें महत्व तें काय राहिलें. यावेळीं कीचकमामा असते तर किती चांगलं झालं असतें. काय करावं कांहीं सुचत नाहीं. यावेळीं कचर खावी तर मी क्षत्रिय कसचा ? आणखी यावेळीं एखादा चांगला सारथीही नाहीं. काय करावें ?

( उत्तरा प्रवेश करते ).

**उत्तरा**—( घाईघाईनें ) अरे दादा, स्वस्थ काय बसलास ? उत्तर गोग्रहणासाठीं कौरवसेना अगदीं सरहद्दीवर येऊन थडकली. दक्षिणेकडे बाबांना तो दुष्ट दुर्योधन कैद करून नेत असतां बल्लवानें मोठा पराक्रम करून त्यांना सोडविलें, कंक, ग्रंथिक व तंतिपाळ यांनीं कौरवसेनेची दाणादाण करून नगराकडे फिरले. दादा, तूं ही अमोल्य संधी दवडूं नकोस. उत्तरेकडे तूं फत्ते मिळीव कीं—

**पद.**

**अरिदला समरिं जिंकोनी ॥ ये त्वरें फिरुनि या सुजनीं ॥**
**करिं पंचारती घेऊनी ॥ मस्तकीं तिलक लावोनी ॥**
**आरती बांधवा करुनी ॥ होईल धन्य तव भगिनी ॥**

ही इच्छा तुजवांचोनी ॥ पुरवील कोण या भुवनीं ॥
ओंवाळणि ही देई ॥ सत्वरी उत्तरा सुजनीं ॥ धृ० ॥

क्षत्रियपुतानें यावेळीं पराक्रम न दाखवावा तर केव्हां? देवानें मंलां बायकोचा जन्म दिला नसता व बहिणीच्या ऐवजीं भाऊ असतें तर हँ हँ म्हणतां विद्युल्लतेप्रमाणें त्यांच्या सेनासमूहांत घुसून त्यांच्या सर्व सेनेची दाणादाण करून टाकली असती. तूं जर कचर खाशील तर पुरुषाचा वेष घेऊन मी समरभूमीवर प्रवेश करीन. बायकांनीं युद्ध करूं नये अशाबद्दल शास्त्राची थोडचि आडकाठी आहे.

**उत्तर**—पुरे पुरे पराक्रम आपला. ही भातुकली का तूं समजतेस? नुसत्या रणवाद्यानें कानठळ्या बसून जातलि. ते उल्हाट यंत्रांचे प्रचंड आवाज. सूँ सूँ सूँ करणारे बाणांचे वर्षाव, मधून मधून वीरांना उत्तेजन मिळण्याकरितां शिंगें, शंख, तुताऱ्यांचे भीषण नाद, प्रळयकाळासारखीं भयंकर अस्त्रें; हीं जेव्हां पाहशील तेव्हां ही विरश्री जिथल्या तिथेंच राहील. समर भूमीवर नुसती बडबड उपयोगी पडत नाहीं. तेथें पराक्रमावरच सर्व गोष्टी अवलंबून असतात. सेनानायक मोठा धोरणी, धैर्यशाली व कावेबाज असावा लागतो. सेनापती कुशल असल्यावर तो थोड्या फौजेसह अफाट सेनेची दाणादाण करून टाकतो. नाहींतर प्रचंड सेना असून व सेनापतीच्या अंगीं शौर्य नसलें तर कांहीं उपयोग नाहीं. पण काय करूं? हें सर्व मला कळतं आहे. यावेळीं मी कसा गांगरून गेलों आहे.

**उत्तरा**—दादा, इतके दिवस युद्धकलेचें शिक्षण घेऊन तूं केलंस तरी काय?

॥ पद ॥

॥ भाऊराया समर करुनियां ॥ मिळवी जगीं सुयश विजया ॥ भाऊ० ॥ क्षत्रिय कुलिं तव जन्म असोनी ॥ भीति धरिसी कांरे स्वमनीं ॥ हें तुजला योग्य नसे ॥ विजेपरी गमन करि सखया ॥ धृ० ॥ क्षत्रियदेह रणांगणीं पडतां ॥ मुक्ति त्याजला मिळुनि तत्वतां ॥ स्वर्गपुरीं जाऊनीयां ॥ अक्षय घे मिळवुनियां ॥ सुखशांती हरिसी नमुनीयां ॥ धृ० ॥

दादा, केव्हां केव्हां गमतीच्या वेळीं बृहन्नडा असल्या गोष्टी आह्मांला सांगूं लागली कीं किती मौज वाटते ह्मणून सांगूं? दादा, तूं बृहन्नडेला बरोबर घेतलीस तर तुझी फत्ते होईल.

**उत्तर**—कंक, बल्लव, ग्रंथिक, तंतिपाळ व बृहन्नडा हीं पांच रत्नें आह्मांला ईश्वरानें दिलीं ह्मणायचीं ? आणखी ज्यापेक्षां बाबांनीं जय मिळविला त्यापेक्षां बृहन्नडेच्या साह्यानें उत्तरेकडेही मला जय मिळेल.

( उत्तरा बृहन्नडेला घेऊन येते. )

**बृहन्नडा**—युवराजा, एवढ्या जलदीनें बोलावण्याचें कारण कांय ? व तें मला उत्तरेकडून समजलं. पण अशा वेळीं माझ्या सारख्या अर्धवटाकडून समरामध्यें तुला सहाय कसं मिळणार हीच पंचाइत आहे.

**उत्तर**—बृहन्नडे, पांडवांच्या सेनेंत तुमचे पुष्कळ दिवस गेले असल्यामुळें अशा बिकट प्रसंगीं तुमच्या साह्याची विशेष जरूर आहे. कारण दाक्षिणेकडे बाबांना विजय मिळविण्यास कंक, बल्लव, ग्रंथिक, व तंतिपाळ हे आहेतच. यावेळीं तुमचं मला साहाय असलं ह्मणजे भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा इत्यादिकांना मी त्राही भगवान् करून सोडतों.

**बृहन्नडा**—( स्वगत ) वेड्या, अद्याप ओठावरचा जार सुद्धां वाळला नाहीं तोंच फुशारकी कशाला मारतोस ? ती कर्दनकाळासारखी अफाट सेना पाहिलीस कीं तुझ्या उरांत धडकी भरून अंगांत फेफरें भरून ही बालीश बडबड कमी होईल. असो, यावेळीं यांना साह्य करून खाल्लेल्या अन्नाचें चीज करून दाखवावें व कौरवांची रग जिरवावी. ( उघड ) उत्तरा, माझ्यासारख्या नटाचें काम ह्मणजे गावं, नाचावं, नानाप्रकारची वाद्यें वाजवून कर्मणूक करावी. लढाईच्या रम्य वार्ता सांगण्याला व ऐकण्याला मनोहर वाटतात पण प्रत्यक्ष समरांगण ह्मणजे यमाचा केवळ दरबार. तिथें प्रवेश करणं अगदीं कठीण. तशांतून प्रवेश झालाच तर समरचतुराई दाखवून शत्रूला पादाक्रांत करणं फारच बिकट. तेथील देखावा फारच भयाण. युवराजा, काय सांगूं युद्धाची आठवण झाली कीं माझी गाळणच उडते.

**उत्तरा**—बृहन्नडे, असं हो काय करतां ? दादा, तूं बृहन्नडेला बरोबर घेऊन उत्तरेकडे मोर्चा फिरविलास कीं जय मिळेल. तुम्हीं वरवर बागुलबोवा दाखवून आम्हांला भिववितां हें समजत कां नाहीं ? दादा, तूं यांना घेतल्यावांचून स्वारी करशील तर तुला जय मिळणार नाहीं. एक तर मर किंवा मार आणखी जर का जिवंत शत्रूच्या हातीं सांपडलास तर तूं मेलास असें समजून मी तुझें तोंड सुद्धां पाहणार नाहीं.

**बृहन्नडा**—( स्वगत ) या कुमारीच्या अंगीं केवढं क्षात्रतेज चमकत आहे. उत्तरे, तुला स्त्रीजन्म देण्यांत विधात्यानें मोठी चूक केली म्हणायची ? शाबास ! अशी वीर्यशाली ज्याची अंगना होईल तो मोठाच भाग्यवान समजायचा ? ( उघड ) युवराजा, कांहीं चिंता नाहीं. मी तुझें सारथ्य करीन पण रथ व घोडे चांगले

पाहिजेत. ह्मणजे मी जसा एकादा कुशल नावाडी खवळलेल्या प्रचंड महासागरांत आपली नौका सुरक्षित घेऊन जातो त्याप्रमाणें तुझा रथ महासागरासारख्या खवळलेल्या कौरवसमूहांत घेऊन जाईन. चल तर, मातोश्रींचा आशीर्वाद घे, जगदंबेचें दर्शन घे, म्हणजे परमात्म्याच्या कृपेनें तुला रणांगणांत जयश्री माळ घालील.

**उत्तर**—( आनंदानें ) आहाहा! इतकं मला तुमचें साह्य मिळाल्यावर मी प्रत्यक्ष कालाला सुद्धां भिणार नाहीं. स्वबाहुबलानें आज कौरवांचा असा समाचार घेतों कीं, त्यांनीं माझा पराक्रम पाहून आश्चर्यानें तोंडांत बोटेंच घालावींत. शाबास! शाबास! अशा वीरांच्या आरोळ्यांनीं दशदिशा दणाणून सोडीन. हा पहा, चाललोंच. तुम्हीं मात्र तयारी लौकर करा. शत्रुसैन्यावर केव्हां तुटून पडेन असें मला झालें आहे.

**पद.**

**उत्तरा—**

**करि धन्य क्षात्रवंशाला ॥ जिंकी शत्रुला ॥ झडकरि रणी घे वरोनी जयश्रीला ॥ धृ० ॥ नच पाठ दावी शत्रुला ॥ भिऊं नको शत्रुला ॥ बंधो ॥ सुकीर्ती वरुनि नगराला ॥ धृ० ॥ गोधना रक्षि वेल्हाळा ॥ स्वातंत्र्य रक्षि या काला ॥ वंदूनी हरीपदकमला जाई युद्धाला ॥**

दादा, तूं विजयश्री मिळवून आलास कीं मी तुझी पंचारती करीन, तुझ्या पराक्रमाचीं झोपाळ्यावर बसून गाणीं गाईन.

**पद.**

**जग ह्मणो धन्य तुला बांधवा ॥ यशोदुंदुभी वसुमती-वरती ॥ पराक्रमें गाजवा॥गोधन जीवन या राष्ट्राचें ॥ असे सत्य कीं महा ॥ धृ० ॥ स्वातंत्र्याचें रक्षण**

**करुनी ॥ मिळवी जनीं वैभवा ॥ धृ० ॥ समरांगणीं दे विजय बांधवा विनती असे माधवा ॥ धृ० ॥**

भगवान् श्रीकृष्णपरमात्मा तुला सुयश देवो, हीच त्याला या दीन कन्येची अनन्यभावें प्रार्थना आहे.

( सर्व जातात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

स्थळ रस्ता.

( द्वारपाल प्रवेश करतो. )

**द्वारपाल**–( आनंदानें ) अहाहा ! या विराट नगरीच्या भाग्याचें वर्णन सहस्रमुखी शेषानेंच केलें पाहिजे. दक्षिण गोग्रहणासाठीं कौरव आले असतां त्यांना कंक, बल्लव, ग्रंथिक व तंतिपाल यांनीं पूर्ण नामोहोरम करून नीच सुशर्म्याच्या हातांत सांपडलेल्या आमच्या महाराजांस सोडवून मोठाच पराक्रम केला. अहाहा ! धन्य ती या वीररत्नांना प्रसवणारी माता ! नाहीं पेक्षां आह्मी शेंदाड शिपाई, नुसता डौल तेवढा पाहून घ्यावा. पराक्रमाच्या नांवानें मात्र पूज्य. राजधानींत आज महाराजांचा प्रवेश होणार ह्मणून नागरिक जनांनीं आनंदानें महोत्सवाची अगदीं गर्दी करून टाकली आहे. सुवासिनी स्त्रिया रस्त्यावर चंदनाचे सडे घालून वरती नानाप्रकारच्या सुरंगमिश्रित रांगोळ्या काढीत असलेल्या मला कितीतरी आढळल्या. थोड्या दिवसांपूर्वी सेनापती कीचकाच्या वधामुळें जी नगरी शोकार्णवांत निमग्न झाली होती, तीच नगरी आज आनंदार्णवांत एखाद्या सुंदर नौकेप्रमाणेंच तरंगत आहे कीं काय असें वाटूं लागलें. तेव्हां ईश्वरा तुझी लीला मोठी अगम्य आहे. क्षणांत हंसवितोस व लगेच

रडवितोस; हें तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे. आह्मां अज्ञ व मूढ मानवांच्या हातीं यांतील कांहीं एक नाहीं. ईश्वरकृपेनें युवराज उत्तर महाराजांची स्वारी विजय संपादून आली कीं, मग वैभवमंदिरावर कळसच चढला असें समजलें पाहिजे. ईश्वराची कृपा होऊं लागली कीं आनंदी आनंदाला कमी थोडेंच पडणार आहे. अधम गतप्राण झाल्यामुळें ही विराटनगरी ग्रहणांतून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें कितीतरी शोभायमान दिसत आहे. ईश्वरा, माझ्यासारख्या हतभाग्याची हिला फिरून दृढ न लागो हीच तुझ्याजवळ प्रार्थना आहे. (ऐकलेंसें करून) अरे, हा काय चमत्कार. हें उल्हाटयंत्रांचे मेघगर्जनेप्रमाणें आवाज कुठून बरें ऐकूं येतात. त्याप्रमाणेंच वीरांच्या आरोळ्यांनीं ह्या दशदिशा कशा दणाणून जाऊं लागल्या. यावरून मला असें वाटतें कीं अगदीं शहरानजीक आमच्या व कौरवांच्या सेनेची धुमश्चक्री चालली असावी. असो. प्रत्यक्ष युद्धांत जाणें माझ्या नशिबीं नाहीं तरी युद्धचमत्कार दुरून पाहून तरी नेत्रांचें पारणें फेडून घ्यावें. हा जीवनार्थ कलह युद्धापेक्षांही भयंकर आहे.

( असें ह्मणून जातो. )

---

## प्रवेश ५ वा.

( उत्तर, बृहन्नडा व एकीकडे विराट राजाची सेना असा प्रवेश. )

**बृहन्नडा**—युवराजा उत्तरा, श्रीमहेंद्राच्या कृपेनें हा विजयरथ आपल्याला प्राप्त झाल्या कारणानें आतां पराजयाचें नांवच काढूं नकोस. तुला शस्त्रास्त्रांचा तोटा पडूं नये म्हणून आपल्याला वाटेंत शमीच्या झाडावर आयतीच सामुग्री मिळाली. परमेश्वराची कृपा ह्मणतात ती याला. मला वाटतें पांडवांनीं अज्ञातवास कंठण्याच्या अगोदर आपलीं

शस्त्रास्त्रें या झाडावर सुरक्षीत ठेऊन पुढें गमन केलें असावें. ही त्या पराक्रमी भीमसेनाची गदा, हें त्या किरीटीचें प्रचंड गांडीव धनुष्य, हें नकुलास्त्र हीं मी पुष्कळ वेळां पाहिलीं असल्यामुळें हीं शस्त्रें त्यांचींच अशी माझी बालंबाल खात्री झाली. हं आटप आतां, सांभाळून रहा. प्रचंड कौरवसेनेशीं गांठ आहे. तिळभर देखील आसनापासून ढळतां कामा नये. असा बाणांचा आरंभीं वर्षाव कर कीं मेघांनीं आच्छादिलेल्या गगनमंडळाप्रमाणें कौरवसेनेला झांकून टाक. अरे, असा कावराबावरा काय म्हणून होतोस. युद्धाला आरंभ झाला नाहीं तोंच तुझी ही अवस्था. मग प्रत्यक्ष कृतांताच्या जबड्याप्रमाणें आ पसरून बसलेल्या सेनेच्या मध्यभागीं गेल्यावर तुझी अवस्था काय होईल याची मला कल्पना देखील करवत नाहीं. हायरे भ्याडा! तूं क्षत्रियाचा छावा असून असा घाबरतोस हें तुला मोठें लांछन आहे.

**उत्तर**—( सर्व भाषण चोचऱ्यासारखें व घाबरल्यासारखें बोलावयाचें ) बृहन्नडे, मी तुझ्या पायां पडतों. रथ नगरांत परत घेऊन चला. ही अफाट सेना पाहून माझे डोळे दिपून त्यांना अंधारी येऊं लागली. माझें काळीज थर थर कांपत आहे. सर्वांगाला दरदरून घाम आला आहे! माझ्यानें धीर निघत नाहीं! यापेक्षां तूंच आपल्या हातांनीं मला ठार करून टाक! पण हें युद्ध नको कांहीं नको. मला काय माहीत एवढी सेना अफाट असते तीं, भिंतीवर काढलेलीं रामरावणाच्या लढाईचीं चित्रें मी पाहिलीं होतीं त्यावरून मला असें वाटलें कीं, सेना सेना म्हणतात ती हीच असेल. तर मग अशा सेनेचा फडशा पाडायला किती वेळ लागणार! पण ही सेना पहावी तर वेगळीच दिसते. एखाद्या खवळलेल्या समुद्राप्रमाणें भयंकर ही सेना, त्यांतील रथ ह्या त्या समुद्रांतील नावाच व रथावरील ध्वजस्तंभ ही त्या नावाचीं शिडें अशा एकनादोन किती म्हणून गोष्टी सांगूं. (दच-

कल्यासारखें करून) बृहन्नडे, हा सिंहगर्जनेप्रमाणें महाशंखांचा नाद ऐकून हृदयांत धडकी भरून कानठाळ्या बसल्या. बृहन्नडे, अशी गे काय माझ्याकडे बघून हंसतेस ? तुला थट्टा वाटते पण माझे जीव कासावीस होतात याचें तुला कांहींच वाटत नाहींना. चल कीं गे नगराकडे. अँ अँ अँ अँ ( रडूं लागतो व रथांतून उडी टाकून पळूं लागतो ),

**बृहन्नडा**—( त्याला धरून आणून रथांत बसविते ) हायरे भित्र्या, भटा भिक्षुकाचीं मुलें देखील तुझ्यापेक्षां धीट असतात. असें असून तुझ्यासारख्या पराक्रमी क्षत्रिय पुतानें बायकासारखें रडून पलायन करावें. हें तुला शोभतें काय ? खुळ्या, अवसान खचवूं नकोस. अवसान हें तर मुख्य प्राण आहेत. धीर धर, हिंमत सोडूं नकोस.

**उत्तर**—बृहन्नडे, असे माझे यज्ञांतले पशुप्रमाणें हालहाल करतेस, त्यापेक्षां एकदम मला ठार का नाहीं करून टाकीत. मी व्यर्थ बायकामध्यें बडबड करून फुशारक्या मारिल्या त्याबद्दल मला क्षमा कर. तूं माझें न ऐकशील तर तुझ्या पायाशीं धडकी देऊन आतांचे आतां प्राण देतों पहा.

( असें ह्मणून पायापाशीं धडकी मारतो. )

**बृहन्नडा**—उत्तरा ऊठ, असें करूं नकोस. तूं माझें सारथ्य करशील ना ?

**उत्तर**—तूं मला उत्तेजन दिलेंस तर तें आनंदानें करीन. पण हातांत धनुष्य ह्मणून धरणार नाहीं.

**बृहन्नडा**—तर मग कांहीं वेळ डोळे मिटून बैस.

**उत्तर**—( डोळे मिटतो. )

**बृहन्नडा**—( लढाईचा पोषाख करून हातांत गांडीव धनुष्य

घेते व उत्तराच्या हातांत चाबुक देऊन ) हूं, कर श्रीकृष्णाचें स्मरण आणखी डोळे उघड.

**उत्तर**—( त्याला पाहून आश्चर्यचकित होऊन ) अहाहा ! ह्या मनमोहन देवपुत्राला पाहून माझ्या नेत्रावरील पटल निघून जाऊन मी अगदीं दिपून गेलों. ह्याला पाहिल्याबरोबर माझे बाहु वीरश्रीनें स्फुरण पावूं लागले. हातांत प्रतोद घेतल्याबरोबर केव्हां शत्रुसैन्यांत वायूच्या वेगानें रथ नेईन असें मला झालें आहे. देवपुत्रा, धन्य तुझी. अरे तूं माझ्यावर जादूचा तर प्रयोग केला नाहींसना ? आजन्म मी आतां तुला सोडून एक पळभर देखील इकडे तिकडे जाणार नाहीं. तेजस्वी पुरुषा, आटप लौकर, तोफेंतून सुटलेल्या गोळ्याप्रमाणें एका निमिषार्धांत शत्रूच्या प्रचंड सेनेच्या मध्यभागीं रथ नेऊन कौरवसेनेला चकित करून टाकतों.

**बृहन्नडा**—आतां जितकी चलाखी करशील तितकी थोडीच आहे. ( रथ जवळ गेल्यावर ) हा पहा तो दुष्ट कर्ण, हे गुरु महाराज द्रोणाचार्य, गांगेय, कृपाचार्य, व गुरुपुत्र पराक्रमी अश्वत्थामा. अरेरेरे, यामध्यें माझा हाडवैरी दुष्ट दुर्योधन कोठेंच दिसत नाहीं. त्याच्याशिवाय युद्ध निरस होणार. ( मोठ्यानें ओरडून ) भीष्माचार्यादि मुख्य वीरांनो, अरे कर्णा, अरे विराटाच्या गाई चोरून नेणाऱ्या चोरांनो, अरे क्षत्रिय कर्माला सोडून तुह्मांला चोऱ्या करण्याची बुद्धि कुठून आठवली. थांबा दम धरा. आतां तुह्मां सर्वत्रांचे प्राण माझ्या मुठींत आहेत. एकेकाला असें कांहीं भरपूर प्रायश्चित्त देतों कीं फिरून चोऱ्या ह्मणून करायच्या नाहींत; इतकेंच नव्हे तर अधर्माचरण कालत्रयीं करणार नाहीं अशी तुह्मांला दहशत घालतों. गुरु द्रोणा, आजोबा गांगेया, कृपाचार्य, बंधो अश्वत्थामा, दुष्टाचे अन्नाप्रमाणें तुह्माला दुष्ट बुद्धी सुचली, त्याला तुमचा तरी

काय इलाज. ठीक आहे संभाळून असा. ह्या प्रळयकाळासारख्या असंख्य बाणांचा वर्षाव सहन करा. ( धनुष्याची प्रत्यंच्या ओढून व बाण चढवून ) प्रिय शरांनो, प्रथमतः गुरुचरणाला वंदन करून मग तसेच पुढें शत्रुकंदनाला सुरुवात करा. हे उत्तरा, अश्वाच्या दोऱ्या सैल सोडून दे. प्रळय कालाप्रमाणें शत्रुसेनेची दाणादाण करून त्यांणीं चोरून नेलेलें गोधन परत आणूं या. ( असें ह्मणून रथासह जातात. पडदा पडतो. )

### अंक ४ था समाप्त.

## अकं ५ वा.



### प्रवेश १ ला.

( दक्षिण दिशेकडे जय संपादन करून आलेला राजा विराट कंक, बल्लव, राजाचे मंत्री व इतर परिचारक यांचा प्रवेश. )

**विराट**—आर्य कंक भटजी, आपणा सर्वत्रांच्यां शौर्यानें माझें जीवित रक्षण होऊन कौरवांचा पुरता मोड झाल्यामुळें ते फिरून या विराटाच्या राज्यांत पाऊल देखील टाकणार नाहीत अशी त्यांची त्रेधा उडाल्यामुळें माझा आनंद गगनांत देखील मावेनासा झाला आहे. उत्तरदिशेकडून माझा पुत्र उत्तर विजय संपादन करून आल्यास माझ्या आनंदाला पारावार नाहींसा होईल. असो, आतां कांहीं वेळ चौपट खेळून मग विश्रांती घ्यावी अशी इच्छा आहे.

**कंक**—राजा विराटा, हें द्यूत खेळण्यांत जितकें चांगलें आहे तितकेंच परिणामीं अनर्थावह आहे. ह्या द्युताच्या भरांत मनुष्याला बिलकुल भान रहात नाहीं. हा डाव मोठा उत्पाती आहे. एखादे-वेळीं हा खेळत असतांना मनुष्य संतापला कीं तो आपल्या

प्राणाची देखील पर्वा करीत नाहीं. मग इतरांची त्याला कोठून ओळख राहणार. नलराजाची गोष्ट पुरातनकाळची आहे; पण सध्यांचे प्रसंगीं धर्मराजा द्यूताचे नादानें सर्वस्वाला अंतरून विपत्तीग्रस्त होऊन रानोमाळ भटकत फिरत आहे. हें चालू उदाहरण पाहून तरी द्यूताचा तूं नाद सोडून द्यावास अशी माझी तुला आदरपूर्वक विनंति आहे.

**विराट**—कंकभटजी, उगीच करमणूक ह्मणून दोन डाव खेळूंया; या मध्यें आपल्याला पैज थोडीच लावायची आहे. सैरंध्री, तो सोंगट्याचा पट घेऊन ये पाहूं. ( सैरंध्री पट आणण्यासाठीं जाऊं लागते ).

**सैरंध्री**—( आपल्याशीं तिरस्कारानें ) ज्याच्या पायीं मला अपरिहार्य दुःख भोगावें लागलें, तें दुष्ट द्यूतक्रीडन पाहण्याचें फिरून मेलें माझ्या नशिबीं आलेंच. ( पट घेऊन येते. )

( विराट व कंक डाव खेळूं लागतात तोंच एक समरांगणावरून आलेला हेर प्रवेश करतो. )

**हेर**—राजाधिराज, एक अत्यंत आनंदाचें वर्तमान सांगण्यासाठीं आलों आहें.

**विराट**—सेवका, अरे लौकर सांग काय तें, तुझी शुभवार्ता आनंदाची—

**हेर**—राजा, बृहन्नडेच्या अतुल पराक्रमानें युवराजाची स्वारी विजय संपादन करून नगराकडे यावयास निघाली. सर्व कौरव-सेनेचा मोड होऊन ते दुरात्मे गजपुराला मुठींत जीव धरून पळून गेले. बृहन्नडेच्या पराक्रमानें सर्व सेनासमूहांत मोठेंच कौतुक होऊन राहिलें आहे.

**कंक**—ज्या ठिकाणीं बृहन्नडा त्या ठिकाणीं विजय हा ठेवलेला. ती तशीच पराक्रमी आहे. तिच्या पुढें उभें राहण्याची प्रत्यक्ष कृतांताची देखील प्राज्ञा नाहीं. मग इतरांची काय कथा.

**विराट**—( संतापानें ) कंक भटजी, एकट्या बृहन्नडेची फुशारकी माझ्यासमोर बिलकुल करूं नका. माझा उत्तर पराक्रमानें कांहीं कमी का आहे ? उगीच एखाद्याची फुगवून केलेली प्रशंसा मला तर बिलकूल खपत नाहीं.

**कंक**—उत्तर कसा झाला तरी अझून बच्चा आहे. त्याच्या पेक्षां बृहन्नडा किती तरी कसलेली. प्रत्यक्ष अर्जुनाच्या तालमींत तिचे दिवस गेल्यामुळें हेर सांगतो हें वर्तमान अक्षरशः खरें आहे. मला एखाद्याची उगीच खोटी स्तुति करण्याची मोठी चीड आहे.

**विराट**—मग माझा बालक उत्तर अगदींच कुचकामाचा असें तुमचें म्हणणें कीं काय ?

**कंक**—कदाचित् असेल. अनुभवावांचून बोलणें निवळ मूर्खपणा आहे, असें मीं समजतों. खरें बोलण्याला प्रत्यक्ष काळाची देखील मला भीति नाहीं. मग इतरांचा तो पाड काय.

**विराट**—कंकभटजी, हें तुह्मी कोणापुढें बोलतां आहां याचा विचार केला आहांत काय ? मी तुह्मांला अगदीं कस्पटासमान वाटत आहें काय ? हें घ्या तर मग आतां ह्या गोष्टींचें पारितोषक. ( हातांतील फांसा कंकाला मारण्यासाठीं घेतो. )

**कंक**—बक्षीस तें काय देणार ! मजसारख्या गरीब भिक्षुकाचा राग मानून तुझ्यासारख्या राजानें एकेरीवर येणें अगदीं गैरशिस्त आहे.

**विराट**—तुह्मां भिक्षुकांची जात निवळ सर्पासारखी. वेळ आल्या-

वर उलटायला कमी करणार नाहीं आणि क्षमा मागायलाही मागें पुढें पाहावयाची नाहीं. एक शब्द उच्चाराल तर खबरदार.

**कंक**—अशा पोकळ रागाला मी मुळीं सुद्धां भीक घालीत नाहीं. मग वाटेल तें तूं कर.

**विराट**—हें घे तर तुझ्या कृतींचें प्रायश्चित्त. ( असें म्हणून कंकाच्या मस्तकावर हातांतील फांसा फेंकून मारतो, कंकाच्या डोक्यां-तून रक्ताची धार पडत आहे. तोंच सैरंध्री भांड्यामध्यें रक्त धरते. )

**सैरंध्री**—राजा, काय केलें आपण हें ? ह्यांच्या रक्ताचा एक बिंदु जर भूमीवर पडला असता तर सर्वत्रांची राखरांगोळी उडाली असती; मी जवळ होतें म्हणून बरें झालें. नाहींपेक्षां मोठा अनर्थ गुदरला असता. शिव ! शिव !! हें मेलें द्यूत अगदीं हो वाईट. ह्यांच्या पायीं राष्ट्राचीं राष्ट्रें उलथीं पालथीं पडलीं असें असतां, शहाण्यासुरत्या मनु-ष्यांचे डोळे अद्याप नीट उघडत नाहींत याला ह्मणावें तरी काय ? ( सैरंध्री एकीकडे रडूं लागते ).

**बल्लव**—राजा, तुझ्या अंगीं सारासार विचारशक्ती अगदींच कमी दिसते, मी तुझें अन्न खाऊन शरमिंदा झालों नसतों तर आतांच एका विराटाचे दोन विराट केले असते. पण करूं काय ? राग जेथल्या तेथें निरुपायास्तव दडपून टाकणें भाग आहे. हें रक्त जर बृहन्नडेनें पाहिलें तर तुला तात्काळ वैकुंठयात्रेला जावें लागेल. बृहन्नडा आली असेल तर कृपा करून तिला मात्र कांहीं वेळ इकडे पाठवूं नका. नाहीं तर मोठाच अनर्थ गुदरून आनंदाचा विरस होईल. अरे, हा प्रत्यक्ष धर्माचा अवतार अजातशत्रो धर्मराजा आहे बरें. आज बरोबर अज्ञातवासाचे दिवस परिपूर्ण झाले म्हणूनच उघडपणें खरें वृत्त तुला कळविलें आहे.

**विराट**—( धर्माचे पायीं मस्तक ठेऊन ) राजाधिराज धर्ममूर्ते, या विराटाला क्षमा करा. आपण क्षमा न कराल तर आपले कर्दन-काळासारखे बंधु माझें हाड देखील राहूं देणार नाहींत, श्रीकृष्ण पर-मात्म्याची शपथ घेऊन सांगतों कीं मी आपणास दुष्टबुद्धीनें मारिलें नाहीं. हा सर्व दुष्ट द्यूताचा परिणाम. आपण कोण हें मला अगोदरच सांगितलें असतें तर असा अनर्थ काय म्हणून होता.

**पद.**

**अपराध क्षमा करुनीयां पदरीं घ्या पतिता ॥ अनुचित कृति मजहातून घडली ॥ तनयें जनका शिक्षा दि-धली ॥ दूर तमा करी सविता ॥ क्रोध असे मातंग खरोखर ॥ भ्रष्ट करितसे मानव अंतर ॥ शांति असे सुखसरिता ॥**

राजाधिराज, शरणांगताला आश्रय दिल्यावांचून मी हालणार नाहीं. मी महापातकी कर्मचांडाळ राजमदांत धुंद होऊन माझ्या हातून हें अनुचित कृत्य घडलें. दयासागरा, ह्या दासाला कृतापराधाबद्दल क्षमा करा. ( पायां पडतो. )

**कंक**—( आर्तस्वरानें ) राजा विराटा, ऊठ, तुझ्याकडे यांचा काडीइतका देखील दोष नाहीं. ईश्वरी नेमानेम कधीं चुकत नाहीं. जें झालें तें ठीकच झालें. मला पूर्ण अनुभव आला असतां फशीं पाडणाऱ्या फांशाला काय म्हणून हातांत घेतलें ? बरें झालें. अगदीं जन्माची खोड तुटली.

**विराट**—राजाधिराज धर्ममूर्ते, बलसागरा भीमसेना, सति द्रौपदी, न जाणतां माझ्याकडून अतिशय निंद्य गोष्ट घडली पण

आतां दु:खांत सुख एवढेंच मानतों कीं, पुण्यवान पांडवांच्या सह-वासानें मी व माझें सर्व राष्ट्र धर्ममय झालें. माझी पुण्याई मोठी बलवत्तर, नाहीं पेक्षां आपल्या चरणाची धूळ मज पामराच्या नगराला कशाला लागली असती. असो, आतां चलावं. सर्वांनीं मंगलस्नानें करून नित्यकर्म आटोपून पुढील कार्याला लागलें पाहिजे.

( इतक्यांत उत्तर आल्याची वर्दी येते. )

**हेर**—बृहन्नडेसहित युवराज नगरासान्निध येऊन पोंचले.

**विराट**—आनंद होऊं लागला कीं मग पाहावें तिकडे त्याचें वास्तव्य होऊन दाही दिशा दुणाणून जातात. श्रीकृष्णकृपेनें मोठाच अनर्थ टळला ह्मणायचा. असो. आतां विजय संपादून आलेल्या सेनेचें अभिनंदन करणें हें माझें कर्तव्यच आहे. अजातशत्रो धर्मराज, भीमसेना, सती द्रौपदी, चलावं आतां.

( जातात पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

( स्थळ साधा महाल, सैरंध्री प्रवेश करते. )

**सैरंध्री**—कितीही उपकार करा. पण या क्षणैक बुद्धीच्या राजांचा विश्वास कोणीही धरूं नये. ह्यांचीं मधुर भाषणें कमलपत्रावरील जलबिंदुप्रमाणें क्षणैक, कोणत्याही गोष्टीचा यांचेबद्दल जो कोणी भरंवसा धरील तो हटकून फसावयाचा. दक्षिणगोग्रहणासाठीं आलेल्या दुष्ट कौरवांची दाणादाण करून कैद करून नेत असलेल्या विराटाला माझ्या प्रियपतींनीं सोडवून ज्याचें जिवित्व

व अब्रू रक्षण केली त्याच विराटानें बृहन्नडेच्या पराक्रमाबद्दल कंकांनीं तारीफ केली व ती खरी असून पुत्रमत्सरानें कोणत्याही गोष्टीचा विचार न करितां द्यूताच्या भरांत कंकाचे मस्तकावर फांसा मारला. त्यावेळीं मी तिथें होतें ह्मणून बरं झालं. नाहींपेक्षां जर का त्यांचे रक्ताचा एक बिंदु जमिनीवर पडला असता तर सर्व भूगोलाची राखरांगोळी उडाली असती. ह्या मेल्या सोंगट्या आणि फांसे ज्यानें निर्माण केले असतील, त्याचा खचीत वंशक्षय झाला असेल. ह्या द्यूताच्या पायीं आम्ही थोडीं का दुःखें भोगलीं ! राजा नलाची याचे पायीं थोडी का दुर्दशा उडाली. असो, ह्या द्यूताच्या नादीं जे लागतील त्याचें वाटोळें व्हावयाचेंच. विराटानें याबद्दल क्षमा मागितली म्हणून बरें झालें. नाहीं पेक्षां काय अनर्थ गुदरला असता तो सांगतां पुरवत नाहीं. असो. ह्या मेल्या दुष्ट कौरवांची श्रीकृष्णकृपेनें चांगली विटंबना होऊन ते अधोवदन करून गजपुराला गेले. इकडे विराटाचीं गोधनें त्याला मिळून त्याचें प्रिय स्वातंत्र्य कायम राहिल्यामुळें आज राजवाड्यांत व सर्व नगरांत आनंदीआनंद होऊन राहिला आहे. माझे प्रियपती आज अज्ञातवास परिपूर्ण झाला म्हणून यथा-शास्त्र-विधि-पूर्वक मंगलस्नानें करून राजदरबारांत जाण्याचे तयारींत आहेत. राहुग्रस्त मुक्तचंद्राप्रमाणें या वेळीं आपल्या स्वाभाविक तेजानें ते जनचित्ताकर्षण करीत आहेत. आतां मला देखील मंगलस्नान करून श्रीतुलसीदेवीच्या पूजेला गेलें पाहिजे. ( सुदेष्णा प्रवेश करते ).

**सुदेष्णा**–( सैरंध्रीच्या पायां पडून व हात जोडून ) पांडवनृपस्वामिनी महासती द्रौपदी, मी तुझी योग्यता न जाणतां वैभवाच्या तोऱ्यांत उपमर्द केला, भावाकडून छळ करविला, यासाठीं हे देवी, माझे अपराध पोटांत घालून या दीन झालेल्या भगिनीला पदरांत

घे. महासाध्वी, तूंच क्षमा करशलि तर माझे पातकाचें भस्म होईल. नाहीं पेक्षां रौरव नरकांत देखील मला जागा मिळणार नाहीं. श्रीकृष्णभगिनी द्रुपदनंदिनी देवी पांचाली, मी तुला शरण आलें आहे. शरणागताला अभयवर देऊन कृतापराध क्षमा करा. कर्माप्रमाणें मला तंतोतंत तर फळ मिळालेंच. पण देवी, आतां झालेल्या सर्व गोष्टी विसरून जाऊन मला मुक्त करून चुडेदान दे हीच तुझ्या चरणीं अनन्यभावानें प्रार्थना आहे.

पद. ( सतीस देइ सतत तोष या चालीवर. )

**जें ह्मणतिल तें करितिल सत्य सती भूवरती ॥ श्री हरि या पदकमलीं सत्प्रेमें दे सुगती ॥ सती सीता सावित्री तारामती दमयंती ॥ भूतलांत वंद्य पाहा असती अजुनी सुमती ॥ श्रीदेवी द्रुपदसुते अक्षय सौभाग्यवती ॥ तव किंकरि होइन गे जन्मोजन्मीं सुदती ॥ १ ॥**

( असें ह्मणून द्रौपदीच्या पायां पडते. )

द्रौपदी—सुदेष्णाबाई उठावं. दैवगतीच्या विचित्र खेळाची आज परिसमाप्ति झाली. ज्या गोष्टी व्हावयाच्या त्या होऊन गेल्या; आतां त्याबद्दल खेद मानणें हा निव्वळ वेडेपणा आहे. कुणी कुणाला दूषणें देऊं नयेत. कोळसा उगळावा तितका काळाच. तुमच्याकडे कांहींएक दोष नाहीं बरें. बिकट अज्ञातवासांत राजा विराटानें व तुम्ही आम्हां सर्वांना निभावून घेतलेंत याबद्दल मीच आपल्या पायां पडतें. ( तसें करते ). माझ्याकडून दासीपणांत कांहीं अवज्ञा झाली असल्यास तुह्मीच मला क्षमा करा.

**सुदेष्णा**—महासाध्वी, कितीतरी तुमच्या मनाचा मोठेपणा हा. थोर ते थोर, लवाळ्याप्रमाणें आपणाकडे लहानपणा घेऊन पतिताचा उद्धार करतां तेव्हां आपल्या गुणाचें कितीतरी वर्णन करावें. तुम्ही साक्षात् जगदंबेचा अवतार आहांत. आपल्या पायांची मी केवळ धूळ आहें. देवी, आतां मंगलोपचारांनीं आपल्याला न्हाऊं घालून स्वतः आपल्या हातानें वेणी घालून उत्तम वस्त्रालंकारांनीं भूषित करून आपली उटी भरीन त्यावेळेस माझ्या नेत्राचें पारणें फिटेल.

**द्रौपदी**—सुदेष्णाबाई, बाकीचे सर्व उपचार मी करून घेईन. माझ्याकडून बिलकूल ना नाहीं. पण दुष्ट दुःशासनानें भरसभेंत माझा अपमान केल्यामुळें त्याच्या रक्तानें होणारा वेणीसंहार भीमसेनाच्या हातून झाल्याशिवाय मुक्तकेशाच राहिलें. पाहिजे. माझ्या व्रतनियमाचा भंग तुम्ही करूं नका. भगवान श्रीगोपाळकृष्णा, तुझ्याच कृपेनें हा मंगल समारंभ पाहण्याचें माझ्या नशिबीं आलें. तेव्हां या किंकरीनें तुझ्या गुणाचें किती जरी चिंतन केलें तरी तें थोडेंच. भगवंता, माझे तुला प्रणाम असोत.

पद.

**तव गुण महिमा वर्णाया ॥ सहस्रमुख रसना थकल्या उमजेना तव माया ॥ ध्रु० ॥ दुष्ट निर्दलन करुनि भक्त जन ॥ मुक्त करिसि त्रिजगज्जीवन ॥ सच्चित सुखघन पदिं रात्रंदिन ॥ वास घडो यदुराया ॥ ध्रु० ॥** (जाते.)

———

श्वरी लीला अपरंपार ह्मणूनच हा आनंदाचा दिवस उगवला ह्मणा-चा. आतां या आनंदाचा मोबदला ह्मणजे भगिनी उत्तरा कुमार अभिमन्यूला अर्पण करून रक्ताचें नातें निरंतर जोडावें एवढा खाऊ मी महाराज धर्मराजापाशीं मागत आहें तो त्यांनीं मला कृपा करून द्यावा हीच सविनय प्रार्थना आहे.

**धर्मराज**—राजा विराटा, तुझे उपकार आमचे हातून जन्म-जन्मांतरीं फिटणार नाहींत, तुझी गुणग्राहकता; सौजन्य, शांतवृत्ति, निष्कपटाचरण इत्यादि अनेक सद्गुण आमच्या मनांतून आमरणांत जाणार नाहींत. तूं आश्रय न देतास तर आमचे निरुपम हाल झाले असते, ही न फिटणारी उपकृति करून तूं आमच्या शिरावर मोठाच भार ठेवला आहेस तो कधींही कमी होणार नाहीं. असो, सद्गुणी युवराज उत्तराच्या इच्छेप्रमाणें माझ्या प्राणाहून प्रियकर अशा अभि-मन्यूशीं प्रियकन्या उत्तरा हिचा विवाह करून कायमचा रक्ताचा संबंध जोडून टाकूं. बरें, आजचा हा सुदीन श्रीकृष्ण भगवंताच्या कृपाप्रसादानें आपणा सर्वत्रांना लाभला, यासाठीं सर्वांनीं त्या परमात्म्याला अनन्य भावानें शरण जाऊन खुशाल विश्रांति घ्यावी हेंच या समयीं योग्य आहे.

**पद.**

**खल दुर्जन करुनि नाश ॥ सज्जनास सुखविलास ॥**
**भोगूं दे श्रीनिवास ॥ आस ही मनीं ॥ ध्रु० ॥ त्वन्नामामृत**
**जनांत ॥ सेवूं दे सावकाश ॥ अंतिं पदकमलीं वास ॥**
**देइ त्रिभुवनीं ॥ ध्रु० ॥ सद्गुण तव गावयास ॥**
**सुमति देइ माधवास ॥ व्यास मुनी चरणीं दास ॥**
**लीन हो जनीं ॥ ध्रु० ॥**

# भरतवाक्य.

पद–राग भैरवी. ( चाल–तदानि दानी तों ).

श्रीपति चरणांबुजिं नत होऊं या ॥ निशिदिनीं रमूं या ॥ मुरारि हरी त्वरीत प्रभु ने दुरित विलया ॥ ॥ ध्रु० ॥ सुविमल गुण तव जगतीं या सुखकर पतितोद्धरण करोनी सतत भवाब्धी मधून तारीती ॥ कमल मुख तव बघुनि मन रत होऊनीयां ॥ आनंदांत मग्न सदोदीत डुलतसे हरी ॥ भो मधुसूदन श्रीरंगा ॥ त्वरें ये ॥ उद्धरी नतजन माधवा ॥ ध्रु० ॥

